# नवभारत

डिसेंबर २०१२

कादंबरी व कादंबरीसमीक्षेतील अनुबंध

'बहाद्दरपूरची नीलिमा'

जागतिकीकरणाचा शिक्षणक्षेत्रावरील परिणाम

राज्यघटनेतील गांधीविचार

नेहरूंचे परराष्ट्रधोरण

वाचकांचा पत्रव्यवहार

अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

**– संपादक मंडळ**

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६६। अंक ३। डिसेंबर २०१२
कार्तिक/मार्गशीर्ष शके १९३४
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संग्रहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षांचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका

# नवभारत

## डिसेंबर २०१२

## अनुक्रमणिका

# कादंबरी व कादंबरीसमीक्षेतील अनुबंध

प्रा. डॉ. गोमटेश्वर पाटील

**प्रस्तावना**

आधुनिक मराठी साहित्यातील साहित्यप्रकारांच्या उगमामागे वसाहतवादी समाजरचना कारणीभूत आहे. १८ व्या शतकात पाश्चात्त्य देशांत अनेक साहित्यप्रकारांच्या उगमामागे वसाहतवादी समाजरचना कारण होती. या समाजरचनेतून मध्यमवर्गीयांचा उदय झाला. मध्यमवर्गीयांच्या अभिरुचीतून कादंबरीसारखा वाङ्मयप्रकार उदयास आला. नेमके हेच मराठी कादंबरीच्या उगमाबाबतही झाले. १९ व्या शतकात भारतात नवशिक्षित मध्यमवर्गीय पांढरपेशा समाजाचा उदय झाला. पारंपरिक संस्कृत व अपारंपरिक इंग्रजी यांच्या परिचयातूनच नवशिक्षित प्रभावित झाले. सुरुवातीला नव्या खाणीचा शोध लागल्याप्रमाणे भाषांतरित साहित्याची भरभराट झाली. यातूनच नवनव्या पाश्चात्त्य वाङ्मयप्रकारांचा परिचय झाला. 'कादंबरी' (Novel) सारख्या वाङ्मयप्रकाराचा परिचयही मराठीत याच काळात झाला.

नव्याने शिकलेल्या विद्वानांकडून समाज, संस्कृती आणि साहित्य यांची चिकित्साही होऊ लागली. यातून निबंधासारख्या वाङ्मयप्रकारांचा उगम झाला. नियतकालिकांतून अनेक विचार मांडले जाऊ लागले. अनेक ग्रंथांची परीक्षणे नियतकालिकांतून केली जाऊ लागली. भाषांतरयुगात जे अनेक ग्रंथ लिहिले गेले, अथवा ज्या पुस्तकांची अनेक परीक्षणे केली गेली. त्यांमध्ये 'कादंबरी' या वाङ्मयप्रकारात येऊ घातलेल्या पुस्तकांची परीक्षणेही लिहिली जाऊ लागली. यातूनच आधुनिक मराठी वाङ्मयात कादंबरीची समीक्षा सुरू झालेली दिसते.

मराठी कादंबरी आणि तिची समीक्षा यांचा अन्योन्य संबंध अगदी प्रारंभीपासूनच आहे. प्रस्तुत घटकामध्ये कादंबरी आणि तिची समीक्षा यांतील अनुबंध शोधण्याचा प्रयत्न केला गेला आहे. अनुबंध म्हणजे परस्परसंबंध, लागाबांधा, नाते, अन्वय अथवा जन्मगाठ असे अनेक अर्थ सांगता येतील. मराठी कादंबरी आणि तिची समीक्षा यांची जन्मगाठ प्रारंभीपासूनच दिसते. कोणत्याही कलेचा तत्कालीन युगप्रवृत्तीशी, जीवनधारणांशी, तत्त्वविचारांशी, मूल्यव्यवहारांशी निकटचा व दृढ अनुबंध असतो. हाच अनुबंध मराठी कादंबरी आणि तिची समीक्षा यामध्ये आहे. कादंबरीच्या जन्मापासून निकटच्या काळातच तिची समीक्षा सुरू झालेली दिसते.

**समीक्षा म्हणजे काय?**

समीक्षा म्हणजे एखाद्या वाङ्मयकृतीच्या आस्वादानंतर केलेले तिचे विश्लेषण, अर्थनिर्णयन आणि मूल्यमापन होय. या तीनही कृतींचा समीक्षेमध्ये समावेश होतो. तरीही समीक्षा हा व्यवहार अत्यंत गुंतागुंतीचा आणि व्यामिश्र आहे. तिच्यामध्ये अनेक गुणदोष टीका-टिप्पणी, क्रिया-प्रतिक्रिया यांचा समावेश होतो. समीक्षेविषयी गो. म. कुलकर्णी म्हणतात, "आकलन, आस्वादन, विश्लेषण, संश्लेषण, मूल्यमापन, चर्चा, चिकित्सा, तुलना, न्यायदान, गुणदोषदर्शन, विशदीकरण यांसारख्या अनेक सुट्या किंवा संकुल क्रियाप्रतिक्रियांची गजबज समीक्षेत नेहमीच माजलेली असते. टीका, छाया, अनुवाद, मीमांसा, रसग्रहण, समीक्षण, परीक्षण, परामर्श, अभिप्राय इ. अभिधानांनी समीक्षा ओळखली जाते. तात्त्विक आणि उपयोजित अशा दोन्ही स्तरांवर तिचा संचार असतो." [१]

समीक्षा ही निर्मितीनंतरची एक प्रतिक्रिया असते. एखाद्या कलेची प्रकृती समजून घेण्याचा तो प्रयत्न असतो. समीक्षेमध्ये प्रत्येकाने प्रत्येक वेळी नव्याने केलेला प्रयत्न हा त्या वाङ्मयकृतीची प्रकृती समजून घेण्याचा प्रयत्न असतो. या प्रयत्नातूनच समीक्षा पुढे सरकत असते. कलेची अथवा वाङ्मयीन कृतीची निर्मिती ही जशी सातत्याने चाललेली प्रक्रिया आहे, तशीच समीक्षा ही कधी न संपणारी वाटचाल आहे. मराठी कादंबरीच्या निर्मितीनंतर आणि तिच्या निर्मितीबरोबर चालणारी समीक्षा ही एक अखंड प्रक्रिया आहे. याचे प्रत्यंतर आपणास

कादंबरीचा इतिहास आणि त्याच्या बरोबरीने चाललेल्या समीक्षेकडे पाहिल्यास लक्षात येते. म्हणूनच कलाकृती आणि समीक्षा यांचे परस्परावलंबित्व अपरिहार्य आहे.

**कादंबरी व समीक्षा यांतील अनुबंध**

मराठी कादंबरीची समीक्षा अगदी प्रारंभीपासूनच तात्त्विक आणि उपयोजित अशा दोन्ही स्तरांवर ठोस आणि सडेतोड झालेली दिसते. प्रारंभीच कथात्मक साहित्याचे स्वरूप मांडताना, तिच्यातील वास्तवाची संकल्पना, कादंबरीतील कल्पित, कादंबरीतील नीती इ. तत्त्वांचा पुरस्कार करणारी ही समीक्षा दिसते. पुढे याच तत्त्वांच्या आधाराने ही समीक्षा व्यापक होत गेलेली दिसते.

कादंबरी हा वाङ्मयप्रकार दीर्घ परीघ असणारा आणि व्यापक अवकाश असणारा वाङ्मयप्रकार आहे. मानवी जीवनाचा विशाल पट कवेत घेणारा व लांबी, रुंदी आणि रूपाच्या मर्यादा न पाळणारा असा हा वाङ्मयप्रकार आहे. साहजिकच या वाङ्मयप्रकाराची समीक्षाही व्यापक आणि व्यामिश्रतेकडे झुकणारी आहे. समीक्षेला केवळ वाङ्मयीन विवेचन आणि कलाकृती यांच्या मागेच जायचे नसते, तर त्या वाङ्मयकृती व प्रकाराचा सततचा शोध घ्यायचा असतो. अर्थात हा सततचा शोध म्हणजे त्या वाङ्मयप्रकाराचा इतिहास नव्हे; तर हा शोध म्हणजे स्थल, काळ, अवकाशाच्या पार्श्वभूमीवर त्या वाङ्मयप्रकाराची केलेली तार्किक आणि तात्त्विक मांडणी होय. ही तार्किक आणि तात्त्विक मांडणी करताना समीक्षेला जीवनाच्या अनेकांगांना स्पर्श करावा लागतो. मानवी जीवनातले अनेक विचारप्रवाह, समाज, संस्कृती, इतिहास, मानववंश इ. क्षेत्रांतही समीक्षेला आपल्या वाटा धुंडाळाव्या लागतात. कारण कादंबरीमध्ये या सर्व गोष्टींचा समावेश असण्याची शक्यता असते. म्हणूनच कादंबरीची व्यापकता गृहीत धरून मराठी कादंबरीसमीक्षेलाही आपली दृष्टी व्यापक बनवावी लागते.

मराठी कथात्मक साहित्याची समीक्षाही प्रारंभीपासूनच व्यापकत्वाचा प्रत्यय देणारी आहे. या व्यापक समीक्षेबाबत गो. मा. पवार म्हणतात, "मराठी कथात्मक साहित्याची समीक्षा प्रारंभीपासूनच जोरकस व लौकिकतावादी आहे. ती रोखठोक, तत्कालीन वास्तवाच्या संकल्पनेचा पुरस्कार करणारी, सौंदर्याच्या जोडीने सत्य व नीती यांचा संबंध प्रतिपादन करणारी आहे. याच्या पुढील शंभरेक वर्षांच्या काळात ही मूळ भूमिका टिकवून ती अधिकाधिक सूक्ष्म, व्यापक व प्रगल्भ होत गेली असल्याचे जाणवते."[२] यावरून मराठी कादंबरीची प्रवृत्ती प्रारंभीपासूनच कशा प्रकारची आहे, याचा अंदाज येतो.

**कादंबरीसमीक्षेतील प्रवृत्ती-प्रवाह**

गेल्या शतकभरातील कादंबरीसमीक्षेकडे स्थूलमानाने पाहिल्यास मराठी कादंबरीसमीक्षेमध्ये विविध प्रवृत्तींचा प्रत्यय येतो. मराठी समीक्षेचा इतिहास पाहिल्यास या प्रवृत्ती अनेक वेळा व्यापक, व्यामिश्र व बऱ्याच वेळा एकमेकींत गुंतलेल्या आहेत असे दिसते. अभ्यासाच्या दृष्टीने या प्रवृत्तींचे वर्गीकरण स्थूलमानाने तीन प्रकारे करता येईल. या तीन प्रवृत्तींमध्ये पहिली प्रवृत्ती प्रामुख्याने कादंबरीची पायाभूत चर्चा करणारी, कादंबरीचा काल-अवकाश-क्षेत्र-परंपरा यांच्या व्यापक दृष्टिकोनाचे भान ठेवणारी दिसते. कादंबरीसमीक्षेची दुसरी प्रवृत्ती कादंबरीची रचना, तिचे रूपतत्त्व, तिची संरचना, तिच्यातील सत्य-सौंदर्य, तिची कलात्मकता कलेच्या दृष्टीने कादंबरी या कृतींच्या स्वायत्ततेवर आधारलेली, विविध विचारप्रणालींवर आधारलेली दिसते; तर कादंबरीचा ऐतिहासिक आढावा, कादंबरीची स्फुट समीक्षा, विविध विचारप्रणाली, वाङ्मयीन अभ्यासाच्या दृष्टीने विद्यापीठीय अभ्यासक्रमाची समीक्षा, विशिष्ट लेखक, विशिष्ट प्रकार-प्रवाह यांच्या अनुषंगाने विकसित झालेली कादंबरीसमीक्षेची तिसरी प्रवृत्ती दिसते. मराठी कादंबरीसमीक्षेला कादंबरी या वाङ्मयप्रकारा-प्रमाणेच निश्चित सीमारेषा नसल्या, तरी समीक्षेविषयी काही ढोबळ आडाखे मात्र करता येतील. या तीन प्रवृत्ती अशा–

१. मराठी कादंबरीची सैद्धान्तिक व तात्त्विक विचार मांडणारी प्रवृत्ती.
२. रीतिनिष्ठ, रूपवादी, आकृतिनिष्ठ, सौंदर्यवादी व संरचनावादी तसेच काही वाङ्मयीन तत्त्वांच्या आधारे तत्त्वसिद्धान्तांचे उपयोजन करणारी प्रवृत्ती.
३. तंत्र-मंत्रनिष्ठ, स्फुट, विशिष्ट कादंबरी, विशिष्ट

अनुक्रमणिका





कादंबरीकार आणि विद्यापीठीय अभ्यासाच्या आवश्यकतेतून निर्माण झालेली, वाङ्मयीन वाद या अनुषंगाने झालेली समीक्षाप्रवृत्ती.

यांपैकी पहिली प्रवृत्ती 'कादंबरी म्हणजे काय?' या प्रश्नाचे उत्तर शोधताना कादंबरीचे काव्यशास्त्र निर्माण करण्याच्या प्रयत्नात असणारी प्रवृत्ती आहे. कादंबरीचा एकूण आवाका, काल-अवकाश लक्षात घेऊन तिच्याविषयी भूमिका मांडणारी अशी ही प्रवृत्ती आहे. यात काही तत्त्वे व सैद्धान्तिक भूमिका मांडलेल्या दिसतात. त्यामुळे या समीक्षेला 'सैद्धान्तिक समीक्षा' म्हणता येईल.

कादंबरी कशी आहे, तिची संरचनात्मक व्यूहरचना काय आहे, कादंबरीत काय असावे म्हणजे तिला कादंबरी म्हणता येईल? 'साहित्यातील सौंदर्य आणि कादंबरी', 'साहित्याचे रूप आणि कादंबरी', 'कादंबरीची घटकचर्चा', 'साहित्यातील कलात्मकता' आणि कादंबरीची तत्त्वे, घटक, वाद, संप्रदाय या अंगाने झालेली समीक्षा या दुसऱ्या प्रवृत्तीत आढळते. त्यामुळे या समीक्षेला 'उपयोजित समीक्षा' म्हणता येईल.

कादंबरीसमीक्षेच्या तिसऱ्या प्रवृत्तीमध्ये कादंबरीविषयीची स्फुट स्वरूपात नेहमी होणारी चर्चा, विशिष्ट कादंबऱ्या, विशिष्ट कादंबरीकार, वाङ्मयीन वाद आणि वादाच्या अनुषंगाने झालेली समीक्षा, साहित्यातील विविध विचारप्रवाह व या विचार व प्रवाहांच्या अनुषंगाने झालेली कादंबरीचर्चा, विद्यापीठीय अभ्यासक्रम व त्या अभ्यासक्रमाच्या आवश्यकतेनुसार झालेली कादंबरीसमीक्षा यांचा अंतर्भाव करता येईल. उपयोजित समीक्षेचाच हा एक भाग म्हणता येईल.

**कादंबरीसमीक्षेमध्ये वाटचाल व समीक्षाप्रवृत्ति-प्रवाहांचा अनुबंध**

कादंबरीसमीक्षेमध्ये कादंबरीचा आस्वाद घेताना, तिचे विश्लेषण, मूल्यमापन करताना वेगवेगळे विचारप्रवाह व प्रवृत्ती निर्माण होतात. कादंबरीचा जो विशिष्ट वाचकसमूह असतो, त्याची विशिष्ट अभिरुची असते. या विशिष्ट अभिरुचीच्या वाचकसमूहाच्या रेट्यातून विशिष्ट दृष्टिकोन निर्माण होतात व त्या दृष्टिकोनांतून एखादी प्रवृत्ती जन्मास येते. या वाचकांमध्ये समीक्षक हासुद्धा प्राथमिक स्तरावर वाचकच असतो, हेही येथे लक्षात घेतले पाहिजे.

कादंबरीच्या विश्लेषणप्रक्रियेतून मतमतांतरे निर्माण होतात. कादंबरीला कादंबरी ठरविण्यासाठी कादंबरीच्या विश्लेषणप्रक्रियेतून काही निकष निर्माण केले जातात. हे निकष निर्माण करताना जे भेद अथवा विचारप्रवाह निर्माण होतात, त्यांतूनच समीक्षेच्या विशिष्ट प्रवृत्ती निर्माण होतात. ही मतमतांतरे, हे भेद का निर्माण होतात, या विषयी वा. ल. कुलकर्णी म्हणतात, त्याप्रमाणे 'साहित्य-समीक्षेमध्ये मतामतांचा गलबला ऐकू येतो.'[३] कोणत्याही दोन समीक्षकांचे कोणत्याही प्रश्नावर एकमत असल्याचे दिसत नाही. या मतमतांतरांमध्येच समीक्षेच्या प्रवृत्तींचा उगम आहे. याची कारणे शोधू पाहता. प्रत्येक समीक्षकाची वा वाचकाची एक विशिष्ट दृष्टी यामागे असते, असे दिसते. आता या दृष्टी कोणत्या, ज्यांतून समीक्षेच्या प्रवृत्ती निर्माण होण्याची शक्यता असते, याची चर्चा पुढीलप्रमाणे करता येईल. कादंबरीसमीक्षेचे विविध दृष्टिकोन व त्यांतून निर्माण होणाऱ्या कादंबरीसमीक्षेच्या प्रवृत्तींचे विश्लेषण खालीलप्रमाणे–

**कादंबरीसमीक्षेचे विविध दृष्टिकोन**

**१. पहिला दृष्टिकोन**

या दृष्टीचे-दृष्टिकोनाचे वाचक-समीक्षक वाङ्मयीन व्यवहाराची जाण असणारे, कादंबरी अथवा कलाकृतीच्या प्रकृतीची-परंपरेची आणि स्थितिगतीची अधिक जाण असणारे, साहित्याचे आकलन, विश्लेषण आणि मूल्यमापन करणारे असतात. यांच्याकडून कलाकृती अथवा कादंबरीविषयी विशिष्ट पद्धतीने पडताळणी केली जाते. कलाकृती अथवा कादंबरीला तिचे रूप ठरविण्यासाठी काही निकष निर्माण करणारे तिच्या प्रकृतीचे स्वरूप, तिची परंपरा, तिच्याविषयीच्या काही पायाभूत नोंदी आणि तिचा मूलगामी शोध घेणारे हे प्रारंभीचे वाचक असतात. यांनाच समीक्षक म्हटले जाते. कादंबरी अथवा कलाकृतीला कादंबरी ठरविणे अथवा कलाकृती ठरविणे यासाठी हे समीक्षक जे काही निकष अवलंबितात, ते निकष सत्यावर आधारलेले, वस्तुनिष्ठ असणारे व त्या वाङ्मय-प्रकाराविषयी तात्त्विक व सिद्धान्तवजा मांडणी करणारे असतात. या दृष्टिकोनाच्या समीक्षक-वाचकांनाच सैद्धान्तिक वा तात्त्विक विचार मांडणाऱ्या प्रवृत्तीचे लेखक

अथवा समीक्षक म्हणता येईल.

**२. दुसरा दृष्टिकोन**

कादंबरीविषयी दुसरा दृष्टिकोन असणारे वाचक-समीक्षक व त्यांची प्रवृत्ती काय असते? या दृष्टिकोनाचे लेखक-समीक्षक केवळ आस्वादन, आकलन, ऐतिहासिक आढावा, चर्चा, चिकित्सा, तुलना, न्यायदान, प्रतिक्रिया, टीका, मीमांसा, रसग्रहण, समीक्षण, परीक्षण, परामर्श, अभिप्राय इ. नावांनी जी समीक्षा ओळखली जाते, त्या दृष्टिकोनातून येथे कलाकृती अथवा कादंबरी शोधतात. या भूमिकेमध्ये कलाकृती अथवा कादंबरीच्या स्वरूपाविषयी कोणतेही तात्त्विक प्रश्न उपस्थित केलेले नसतात. आणखी एक म्हणजे या दृष्टिकोनामागे आस्वादक, कलात्मक आणि सौंदर्यवादी दृष्टी असते. प्रा. नेमाडे हिला 'रीतिनिष्ठ-रूपवादी आकृतिनिष्ठ-सौंदर्यवादी समीक्षा' या नावाने संबोधतात. या समीक्षेमध्ये काही वेळा वायफळ वाद व निष्फळ चर्चा होऊन कलाकृतीचे सौंदर्य, कादंबरीतील सौंदर्य, कलेची स्वायतत्ता, कलेचे स्वतःचे नियम यांवर चर्चा व लिखाण होताना दिसते. यातूनही काही सिद्धान्त निर्माण होण्याची शक्यता असते; पण या सिद्धान्तांना दीर्घकाळ वाङ्मयीन निकषामध्ये टिकता येत नाही. जीवनातील विशिष्ट एकांगी दृष्टिकोनाच्या तत्त्वावर आधारलेली ही समीक्षा असते. हा दृष्टिकोन स्वीकारणारे वाचक अथवा समीक्षक व्यक्तिगत अभिनिवेशनातून व्यक्तिगत मतांचा एक दृष्टिकोन निर्माण करताना दिसतात. या समीक्षेमध्ये स्थळ-काल-अवकाश-परंपरा यांचा साकल्याने विचार होत नाही. अशी ही समीक्षेची अथवा वाचकांची दुसरी प्रवृत्ती जाणवते.

**३. तिसरा दृष्टिकोन**

कादंबरीसमीक्षेची तिसरी प्रवृत्ती किंवा तिसरा दृष्टिकोनही आढळतो. हा दृष्टिकोन साधारणतः सक्तीतून, गरजेतून किंवा आवश्यकतेनुसार निर्माण होतो अथवा निर्माण केला जातो. समीक्षा हा एक ज्ञानव्यवहार आहे. हा ज्ञानव्यवहार अभ्यासावर आधारित असतो. हा ज्ञानव्यवहार किंवा अभ्यास बऱ्याच वेळा सातत्याने चाललेला असतो. तो विद्यापीठांमध्ये, महाविद्यालयांमध्ये किंवा संस्थात्मक पातळीवरही चाललेला असतो. या अभ्यासाच्या व ज्ञानव्यवहाराच्या गरजेतून मराठी साहित्यात बरीचशी समीक्षा निर्माण झालेली आहे. महाविद्यालये आणि विद्यापीठांमध्ये अध्ययन-अध्यापनाच्या गरजेतून बऱ्याच वेळा ही कादंबरीसमीक्षा आधाराला घेतली जाते. विद्यापीठीय परीक्षेतील प्रश्न-उत्तरांच्या मांडणीतून विशिष्ट प्रकारची समीक्षा उदयास येते. यातून काही समीक्षाग्रंथही निर्माण झाले आहेत. बऱ्याच समीक्षकांनी आपला हा उद्देश समीक्षाग्रंथांत स्पष्टही केला आहे. उदा., *धार आणि काठ* या ग्रंथाच्या प्रस्तावनेत नरहर कुरुंदकर म्हणतात, "ते (विद्यार्थी) दरवेळी काहीतरी नवे प्रश्न उपस्थित करीत. प्रश्नांची उत्तरे देणे भाग असे. या चर्चेमधून क्रमाने मराठी कादंबरीच्या विकासाविषयी माझी काही मते निश्चित होत गेली. मुळात हे पुस्तक म्हणजे एक चाळीसपानी ट्युटोरिअल होते व ते ट्युटोरिअल वा. लं. च्या दडपणाखाली लिहिणे भाग पडलेले होते"[४]

अशा प्रकारे काही प्रमाणात सक्तीची व गरज म्हणून निर्माण झालेली अशी ही समीक्षा असते, याची कल्पना वरील उदाहरणावरून येऊ शकेल.

याशिवाय पीएच.डी. या पदवीच्या प्रबंधासाठी निर्माण झालेली कादंबरीसमीक्षाही मराठी कादंबरीसमीक्षेत विपुल प्रमाणात आढळते. विशिष्ट लेखक, विशिष्ट कादंबरी, विशिष्ट प्रवाह-प्रवृत्तीतील कादंबऱ्या, विविध वाङ्मयीन विचारप्रवाह, वाङ्मयीन वाद, चर्चासत्रे, परिसंवाद या अनुषंगाने मराठी कादंबरी समोर ठेवून झालेली समीक्षाही मराठी कादंबरीसमीक्षेत आढळते. अशी ही तिसऱ्या प्रवृत्तीची कादंबरीसमीक्षा मराठी साहित्यात विपुल प्रमाणात आढळते.

**एकूण मराठी साहित्याची समीक्षा व कादंबरीसमीक्षा**

कादंबरीसमीक्षेच्या या तीन प्रवृत्ती-प्रवाहांचा शोध घेतल्यानंतर कादंबरीसमीक्षेचे स्वरूप पाहता एकूण मराठी साहित्याची समीक्षासुद्धा लक्षात घेणे गरजेचे ठरते. एकूण मराठी साहित्याची समीक्षा काय आहे, हे लक्षात घेताना व तिचे स्वरूप पाहताना असे दिसून येते की, मराठी साहित्य आणि त्याची समीक्षा यांचा अनुबंध जवळचा आहे. किंबहुना मराठी साहित्य आणि त्याची समीक्षा समांतर आहेत. मराठी भाषा आणि मराठी वाङ्मयाच्या उत्पत्तीपासूनच त्याची समीक्षाही स्वतंत्रपणे अस्तित्वात

होती, असे दिसून येते. ही समीक्षा व तिचे स्वरूप पुढीलप्रमाणे –

समीक्षेमध्ये साहित्याचे नियमन व नियंत्रण करणारी काही तत्त्वे असतात. त्यांचा बरेवाईटपणा पारखणारी स्वतंत्र गमके असतात. साहित्याविषयी व जीवनाविषयी जी काही सर्वमान्य तत्त्वे असतात, त्या तत्त्वांच्या पायावर समीक्षा उभी असते. या तत्त्वांच्या आधारेच समीक्षा लेखकाला साहित्यनिर्मितीच्या संबंधातील सामर्थ्याची आणि दौर्बल्याची जाणीव करून देत असते. साहित्याचे परिशीलन कसे करावे, यासंबंधी वाचकाला सूचित करत असते. साहित्याच्या प्रकृतीविषयी वाचक आणि समीक्षक यांची जाण वाढवण्याचे काम समीक्षा करते. साहित्याविषयी अभिरुची वाढवणे व साहित्य ही समाजोपयोगी गोष्ट आहे, याची जाणीव वाचकांमध्ये निर्माण करणे, अशी अप्रत्यक्ष कामे समीक्षा करीत असते. समीक्षेच्या मुळाशी समीक्षेची म्हणून काही तत्त्वे असतात. ही तत्त्वे म्हणजेच समीक्षेची मूल्यव्यवस्था होय. या मूल्यव्यवस्थेमागे काही जीवनविषयक धारणा अध्याहृत असतात. समीक्षेतील ही तत्त्वे, मूल्ये, धारणा ह्या जीवनातील विविधांगांतून निर्माण होतात. या तत्त्वांना परंपरेचे भान असते, सत्य आणि नैतिकता यांच्या पायावर या धारणा उभ्या असतात. परंपरा आणि जीवनजाणिवा यांतून काही सार्वत्रिक निष्कर्ष आणि सिद्धान्त निर्माण होतात. हे निष्कर्ष आणि सिद्धान्त या समीक्षेमागे असतात. समीक्षेच्या मुळाशी असणारी ही तत्त्वे, निष्कर्ष, मूल्ये, धारणा या बहुतेक वेळा सार्वत्रिक असतात. काही वेळा ही मूल्ये शाश्वत असतात. काळाबरोबर साहित्य बदलले, तरी शाश्वत मूल्ये मात्र बदलत नाहीत. साहित्याची रूपे बदलणारी असतात. ही शाश्वत मूल्ये अचल असतात. परंतु समीक्षेमध्ये काही वेळा या अचल घटकांबरोबरच चल घटकही येतात. हे चल घटक काळाबरोबर आपला प्रभाव निर्माण करतात व त्यानंतर प्रभावहीन होतात. म्हणून साहित्यातले चल घटक कोणते व साहित्याची शाश्वत मूल्ये कोणती, यांचा अचूक विचार समीक्षेमध्ये महत्त्वाचा ठरतो.

मराठी समीक्षेमध्ये अशा अचल व शाश्वत मूल्यांची निकषव्यवस्था घेऊन चालत आलेली समीक्षा अगदी प्रारंभीपासूनच दिसते. काळ, अवकाश, परिस्थिती आणि क्षेत्रानुसार समीक्षेतील निकषव्यवस्था बदलली, तरी समीक्षेविषयीची काही शाश्वत मूल्ये साहित्यामध्ये प्राचीन काळापासून आहेत. बाईदेव व्यासांच्या 'ग्रंथु निका जाला असे'या अभिप्रायापासून महिपती ताहाराबादकरांनी मोरोपंतांना आध्यात्मिक लावणी करण्यासाठी दिलेला उपदेश, हा येथील निव्वळ मराठी साहित्याच्या तपासणीतून निष्पन्न झालेल्या मूल्यव्यवस्थेचाच एक भाग मराठी साहित्यपरंपरेत दिसतो.

साहित्य ही समाजजीवनातील सत्त्व मुरवून घेणारी अग्रेसर कला आहे. साहजिकच समीक्षा हासुद्धा साहित्यकलेचाच एक भाग असल्याकारणाने तिथल्या काल, अवकाश, परिस्थिती आणि क्षेत्रातल्या तत्त्व-मूल्य-धारणांचे आविष्करण समीक्षेतून होत असते. हेच आविष्करण प्राचीन साहित्याविषयीच्या त्रोटक समीक्षेतून दिसते. ही मूल्ययुक्त, सत्त्वयुक्त, अचल, शाश्वत समीक्षेची मूळची प्रवृत्ती मराठी समीक्षेत प्रारंभीपासूनच होती; आजही काही अंशी आहे.

परंतु आधुनिक कालखंडात भाषांतरयुगानंतर युरोपियन साहित्याचे आदर्श समोर ठेवून मराठी साहित्यात वाङ्मयनिर्मितीला सुरुवात झाली. त्यामुळे युरोपियन समीक्षेचे आदर्श डोळ्यासमोर ठेवूनच मराठी साहित्यात समीक्षेचेही अनुकरण होऊ लागले. पाश्चात्त्य साहित्यातील वाङ्मयीन वाद आणि समीक्षामूल्ये मराठी साहित्याला लावण्याचा प्रयत्न सुरू झाला आणि मराठी समीक्षेची 'स्व'च्या पर्यावरणातील सत्त्व घेऊन होणारी समीक्षा कमी होऊ लागली. आधुनिक मराठी साहित्यात निर्माण झालेले अनेक वाङ्मयप्रकार युरोपियन वाङ्मयप्रकारांचेच अनुकरण असल्याने त्यांच्या तपासणीचे निकषही तिकडील निकषांच्या धर्तीवर काढण्यात येऊ लागले. परिणामतः साहित्यामध्ये काही प्रवृत्ती, काही विचार, काही धारणा आणि आकारबंध पुनःपुन्हा पाश्चात्त्यांच्या अनुकरणातून येऊ लागल्याने मराठी समीक्षेतही काही तत्त्वांचे पाश्चात्त्यांच्या अनुकरणाने सिद्धान्तन झाल्याचे दिसते. राजकीय आणि सांस्कृतिकतेसह आपण पाश्चात्त्यांचे सर्वच स्वीकारल्याने साहित्य आणि त्याची समीक्षाही त्याच अनुकरणाच्या धाटणीची झाली आहे, हे आपण

नाकारू शकत नाही. त्यामुळे २० व्या शतकाच्या अखेरीपर्यंत तरी पाश्चात्त्य साहित्यातील संकल्पनांचा आणि सिद्धान्तनाचा प्रभाव मराठी साहित्यावर होता, हे लक्षात आल्याखेरीज राहत नाही.

तरीही मराठी साहित्यात भाषा, प्रांत आणि मूळची संस्कृती यांचे सत्त्व काही अंशी का होईना, असल्याने कलम झालेल्या पाश्चात्त्य परंपरेशिवाय इथले सत्त्व टिकवून असलेली परंपरा व या परंपरेच्या अनुषंगाने काही तत्त्वे, काही मूल्ये व काही धारणा यांचे संदर्भ लक्षात घेऊन मराठीत समीक्षा होते आहे, ही महत्त्वाची बाब आहे.

आधुनिक मराठी समीक्षेत पाश्चात्त्य साहित्य-संस्कृतीच्या प्रभावाने जरी समीक्षा निर्माण झाली असली, तरी हरिभाऊ, राजवाडे, केतकर, (काही अंशी) कोल्हटकर, कुसुमावती, शरच्चंद्र मुक्तिबोध आणि त्यानंतर प्रा नेमाडे हे आणि यांच्या प्रभावळीत लेखन, समीक्षण करणारे काही मातब्बर समीक्षक यांची एक परंपरा २० व्या शतकाअखेर मराठी समीक्षेत सातत्याने निर्माण झालेली दिसते.

**१.६ मराठी समीक्षेच्या दोन परंपरा —**

| | |
|---|---|
| १. सशक्त परंपरा | २. अशक्त परंपरा |
| अ. सामाजिक संदर्भ सामाजिक वास्तव | अ. सौंदर्य-कलावादी |
| | ब. रूप-घटकतत्त्वावर आधारलेली |
| क. भोवतालचे पर्यावरण लौकिक जीवनवादी | क. पाश्चात्त्य तत्त्वावर आधारलेली |
| इ. सत्त्वयुक्त परंपरा | ड. आस्वादक स्वरूपाची |

**१. मराठी समीक्षेतील सशक्त परंपरा**

साहित्य हा जीवनाचा अर्थ आहे आणि समीक्षा ही अशा साहित्याचा अन्वयार्थ आहे. मानवी जीवनाची अनेकांगे खऱ्या साहित्यात प्रकटत असतात. ही अनेकांगी दृष्टिकोन असणारी, सामाजिक संदर्भ असणारी अनेकांतवादी समीक्षा– जिच्यात समाज, संस्कृती, परंपरा, सत्य, वास्तव, इ. अनेक गोष्टींचा अंतर्भाव आहे– हिलाच पहिली परंपरा म्हणता येईल; जिला भालचंद्र नेमाडे मेटॅसमीक्षा म्हणतात.

**२. मराठी समीक्षेतील अशक्त परंपरा**

समीक्षेच्या पहिल्या प्रवृत्तीचा विचार केल्यानंतर मराठी समीक्षेत दुसऱ्या प्रवृत्तीची समीक्षा काय आहे, याचे उत्तर आधुनिक कालखंडाच्या संदर्भात शोधू पाहिल्यास तात्त्विक व पायाभूत समीक्षेवर आधारलेली, पण बऱ्याच अंशी युरोपियन साहित्याचे आदर्श समोर ठेवून निर्माण झालेल्या समीक्षेचा प्रत्यय येतो. कलावाद, जीवनवाद, स्वच्छंदतावाद, वास्तववाद, सेंद्रिय तत्त्व, लयतत्त्व, कलेची स्वायत्तता, कलेचे आस्वादन, रसग्रहणात्मकता इ. गोष्टींचा अंतर्भाव असणारी ही परंपरा आहे. अशा अनेक वाङ्मयीन पाश्चात्त्य संकल्पना स्वीकारणारी, या संकल्पनांचे नीटसे अर्थ आणि त्यांची निश्चित तात्त्विक मीमांसा नसणारी, पण गेल्या शंभर वर्षांमध्ये मराठी समीक्षापरंपरेत आपला दबदबा निर्माण करणारी ही समीक्षा विपुल प्रमाणात आढळते. ही समीक्षा विपुल असली, तरी एखाद्या साहित्यकृतीला तिचे निकष लावून निष्कर्षाप्रत गेलेली समीक्षा मात्र क्वचित आढळते. अशा समीक्षेविषयी किशोर सानप म्हणतात, "परिणामतः मराठीत सैद्धान्तिक समीक्षा व उपयोजित समीक्षा असे दोन स्वतंत्र प्रांत निर्माण झाले. मर्ढेकरांचे सौंदर्यशास्त्र, संस्कृतातले रसशास्त्र, नाट्यशास्त्र, अरिस्टॉटलचे काव्यशास्त्र, सौंदर्यमीमांसा, वाङ्मयीन वादसंवाद अशा स्वरूपांत मराठीत सैद्धान्तिक समीक्षेची पेरणी करण्यात आली; परंतु ही पेरणी परकीयांच्या भूमीतील बियाणे असल्याने मराठी भूमीत त्यांची वाढ तर झाली नाहीच; उलट, कॅक्टससारख्या अत्यंत निरुपयोगी, परंतु देखण्या वनस्पतीसारखे निर्जीव असे समीक्षाशास्त्र त्यातून उपजले. दुसऱ्या बाजूला उपयोजित समीक्षेच्या नावाखाली अत्यंत निरर्थक आणि केवळ बढाया मारणारी वर्तमानपत्री समीक्षा जन्माला आली. त्यात समीक्षकांचे आणि साहित्यिकांचे अड्डे तयार झाले आणि कुणाला उचलायचे आणि कुणाला पाडायचे यावर आधीच चर्चा होऊन, डावपेच आखून समीक्षा लिहिण्याचे तंत्रज्ञान विकसित झाले." [५] किशोर सानप यांचे विवेचन मराठी समीक्षेच्या बाबतीत पूर्णांशाने सत्य नसले, तरी त्यातील अर्धसत्य मराठी समीक्षेबाबत नाकारता येऊ नये, अशी मराठी समीक्षेची परंपरा असल्याचे दिसून येते.

मराठी समीक्षेत या समीक्षेने काही सिद्धान्त मांडण्याचा प्रयत्न केला असला, तरी तो पूर्णांशाने यशस्वी झाला असे म्हणता येत नाही. उदा., साहित्याचे सेंद्रियतत्त्व, रूपवाद, लयसिद्धान्त असे काही सिद्धान्त पाश्चात्त्य समीक्षेच्या अनुकरणातून या समीक्षेने स्वीकारल्याचे दिसते. या परंपरेतील मराठीतील मातब्बर समीक्षक मर्ढेकर खुद्द याविषयी म्हणतात, "कोठलाही मराठी टीकाकार घ्या, वाङ्मयाचे विवेचन करताना इंग्रजी उताऱ्यांची कास धरल्याशिवाय त्याचे भागत नाही. त्यामुळे जणू काय ते विवेचन विद्वत्तापूर्ण झाले आहे, असे टीकाकारालाच नाही तर वाचकांनाही वाटते! जे टीकाकार प्रत्यक्ष उतारे घेत नाहीत, त्यांच्याही टीका-विचारांचा प्रवाह सामान्यतः इंग्रजी टीकाकारांच्या धर्तीवरच वाहतो. स्वतंत्र विचाराने तत्त्वे ठरवून जर मराठी टीकाकार लिहीत असतील, तर दुसऱ्या कोणत्याही देशातील वाङ्मयटीकाकारांपेक्षा त्यांच्या लेखात इंग्रजी उतारे का असावेत? आपल्या टीकाकारांच्या या प्रवृत्तीचा मोठा दुष्परिणाम म्हणजे इंग्रजी टीकाकारांची टीकातत्त्वे म्हणजे जणू काय वेदवाक्ये होवून बसली आहेत. फक्त इंग्रजी जीवनपद्धती, वाङ्मय व भाषा यांच्यावर पोसलेली आमची परभृत विचार-भावनासरणी आणि तद्जन्य कल्पनात्मक प्रतिक्रियांचा निर्जीव आवर्तपणा यांच्यामुळे मराठी वाङ्मयाला बाहेर मान मिळणे दुरापास्त झाले आहे."[६] याचप्रमाणे मर्ढेकरांच्या मते, ललित कलांच्या टीका-शास्त्रात इंग्रजी टीकाकारांइतके तात्त्विक दृष्ट्या अविश्वसनीय टीकाकार दुसरे कोणी नाहीत. अशी ही परभृत, पाश्चात्त्यांवर भिस्त असणारी अशक्त परंपरेची मराठी समीक्षेची दुसरी प्रवृत्ती २० व्या शतकाच्या अगदी अखेरीपर्यंत कार्यरत असल्याचे दिसते. आजही मराठीतले अनेक वाद, संकल्पना मराठी समीक्षेत मांडताना पाश्चात्त्य समीक्षेचा संदर्भ लक्षात घेतला जातो. मराठी समीक्षेच्या पाया बळकट करण्यासाठी पाश्चात्त्य संदर्भाचे आधार घेतल्याशिवाय ती मांडली जात नाही, याचे प्रत्यंतर आल्याशिवाय राहत नाही.

**मराठी समीक्षेतील दोन परंपरांची द्विध्रुवात्मकता व कादंबरीसमीक्षा यांचा अन्वय**

कादंबरीसमीक्षेच्या तीन प्रवृत्ती लक्षात घेताना एकूण मराठी समीक्षेच्या या दोन परंपराही आपल्यासमोर असणे महत्त्वाचे ठरते. अशी ही मराठी समीक्षा द्विध्रुवात्मक असल्याचे जाणवते. यांपैकी पहिली परंपरा लौकिकता-वादाकडे, परंपरेकडे, देशीयतेकडे, जीवनवादाकडे झुकणारी दिसते; तर दुसरी परंपरा अलौकिकतावादाकडे, स्वायतत्तेकडे कलात्मकतेकडे, रचनातत्त्वाकडे, सौंदर्यशोधाकडे व पाश्चात्त्यीय अनुकरणाकडे झुकणारी दिसते. या समीक्षेच्या आधारे मराठी कादंबरीसमीक्षेच्या प्रवृत्ती-प्रवाहाचा शोध आणि कादंबरी व कादंबरी-समीक्षेतील अनुबंधाचे संशोधन शक्य आहे.

**संदर्भ सूची –**


१) गो. म. कुलकर्णी मराठी समीक्षेची वाटचाल, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे. १९९८, पृ. ६.

२) गो. मा. पवार/म. द. हातकणंगलेकर (संपा.) निवडक मराठी समीक्षा (प्रस्ता). साहित्य अकादमी प्रकाशन, १९९९, पृ. २.

३) उषा हस्तक, कादंबरी आणि मराठी कादंबरी औरंगाबाद, साहित्यसेवा प्रकाशन. १९९३, पृ. ३१.

४) नरहर कुरुंदकर, धार आणि काठ. देशमुख आणि कंपनी, पुणे. १९७१, पृ. ६.

५) किशोर सानप, भालचंद्र नेमाडे यांची समीक्षा. साकेत प्रकाशन, औरंगाबाद. प. आ. २००५, पृ. ७१.

६) बा. सी. मर्ढेकर, सौंदर्य आणि साहित्य. मौज प्रकाशन, मुंबई. पाचवी आ. १९९२, पृ. १४२.

# 'बहाद्दरपूरची नीलिमा'

श्री. अनिल जोशी

दारिद्र्यातून मुक्तता म्हणजे आत्महत्येचा स्वीकार, असे सूत्र स्वीकारणे, हा पळपुटेपणा ठरतो आणि ही निराशा, हा जीवनाविषयीचा नकारात्मक विचार जेथे रुजला आहे तेथून तो समूळ नाहीसा करायचा असेल, तेथे अत्यंत नियोजनबद्ध प्रयत्नाचा अवलंब हा एकमेव मार्ग आहे. कष्टास-श्रमास विचारांची पक्की दिशा असेल आणि कमालीचा आत्मविश्वास असेल, तर माणूस पूर्णपणे उभा राहू शकतो, यावर दृढ विश्वास ठेवून, गेली अनेक वर्षे कार्यरत राहिलेल्या नीलिमा मिश्राने अनेकांना जीवनाच्या नवीन वाटा दाखविलेल्या आहेत. माणूसच माणसाला उत्तम दर्जाचे जीवन जगण्याचे कौशल्य देऊ शकतो, हे नीलिमाने स्वप्रयत्नाने दाखविले आहे. नीलिमा मिश्रा– एक महिला– गाव बदलू शकते, माणूस बदलू शकते, नैराश्याच्या गर्तेत अडकलेल्या माणसाला जगण्याला प्रवृत्त करू शकते, हे स्वप्न नव्हे तर ही एक सत्यकथा आहे.

धुळे-जळगाव जिल्ह्यांच्या हद्दीवर वसलेले एक छोटेखानी गाव. धुळ्यापासून सुमारे २५ कि. मी. अंतरावर मुख्य रस्त्यापासून आतल्या बाजूचे हे गाव. खानदेशाच्या सर्व खाणाखुणांना आपल्या परिसरात एकवटून राहिलेले हे गाव! नाव आहे बहाद्दरपूर. गावाचा पूर्वेतिहास सांगणारी, थोडीफार वृद्धत्वाकडे झुकलेली माणस गावाची वेस ओलांडल्यावर आपल्या नजरेस पडतात. इतिहासाची साक्ष देणारे जीर्ण वास्तूंचे काही अवशेष गावाच्या एका टोकास थांबून राहिलेले आहेत. पक्क्या विटांच्या भिंतींना आपल्या खांद्यावर घेतलेली दगडी जोती आणि लोखंडाच्याही टिकाऊपणाला मागे सारणारी सागवानी तुळयांची-खांबांची या वास्तूमध्ये झालेली गर्दी यातच या वास्तूंचा, तेथील एकेकाळच्या वास्तुकलेच्या विकासाचा, कलाकारांच्या कलाविकासाचा आणि अशा दिमाखदार वास्तूंची आम्ही उभारणी केली आहे, असे खुणावत राहिलेल्या वैभवसंपन्न ग्रामस्थांचा, धनवान लोकांचा साक्षात इतिहास म्हणजे बहाद्दरपूरच्या परिसरातील ह्या इमारती.

गाव तसे आकाराने छोटे. उभे जास्त आडवे मर्यादितच! दुतर्फा गरिबी-दारिद्र्य यांना आपल्या भोवताली घेऊन उभी राहिलेली घरे! अधून-मधून ग्रामविकासाच्या शासकीय धोरणानुसार गावात झालेला प्रवेश काही मोजक्या इमारती स्पष्टपणे दर्शवितात. त्यात ग्रामपंचायत कार्यालय, ग्रामविकास सोसायटी कार्यालय, दूध डेअरी, एक दोन मंडळांची कार्यालये यांतून शासकीय योजनांनी केलेला प्रवेश आपणास जाणवतो. गावाच्या शेजारीच नदीचे पसरट पात्र आहे. लोक सांगतात, वर्षातून चारदोन वेळा नदीचे पाणी किनारा सोडून गावाच्या आसपास घोटाळते. पण या पाण्याचा वापर ना शेतीला, ना कायम पिण्यासाठी. पण तसा कडकडीत दुष्काळ क्वचितच रेंगाळतो. शेती साधीसुधी. कपाशीने झाकलेली. रानं दूर दूर पसरलेली. पण मधूनमधून केळीची पाने सळसळताना दिसतात. गावकरी सांगतात, अगदी अलीकडे म्हणजे पाचसहा वर्षांतच गावानं थोडं बाळसं धरायला सुरुवात केली. बायका-पोरं अधूनमधून भाजी-पाला खातात. पाण्याचा तुटवडा आणि सुमार कसाची शेती, असे रान हीच या बहाद्दरपूर गावाची धनसंपत्ती!

अशा या वेगळ्या वाटेने जाण्याचा प्रयत्न करणाऱ्या खानदेशातल्या गावाकडे मी मुद्दामच जाणं केलं. हे जाणं होतं ते परिसर-खानदेश-संस्कृती यांना डोळ्यांनी पाहावं, लोकांशी बोलावं, विदर्भ-खानदेशाच्या आसपासच्या गावांतील शेतकऱ्यांच्या गळ्यास दोरी का लागते आहे, हे समजून घेण्यासाठी. माझे ज्येष्ठ मित्र रमेश पानसे यांनी अनेक माणसांना उभं केलंय, उभे राहिले त्यांना चालतं केलंय आणि जे चालू शकतात त्यांच्या पायांना गती दिली आहे. माणसातली ऊर्जा शोधायची, त्याच्या कर्तृत्वशक्तीला टिपायचं, त्याला बोलतं करायचं आणि त्याला जीवन जगण्याची दिशा दाखवण्यासाठी वापरायचं. शिक्षणातले नवनवीन सिद्धान्त बांधणाऱ्या रमेश पानसे

अनुक्रमणिका








यांना जसं शिक्षणशास्त्र कळतं, मानसशास्त्र कळतं, तसं त्यांना अर्थशास्त्र अधिक चांगलं कळतं. या सर्वांचा परिपाक म्हणूनच मरगळलेल्या माणसांना विचारांची ऊर्जा देणे, हा त्यांचा आवडीचा छंद आहे. आम्ही उभयता धुळे मुक्कामी असताना त्यांनी मला सुचविले की, तुला एका विलक्षण कर्तृत्वाच्या महिलेचा परिचय करून देतो. अस्मादिक भारावले. तत्क्षणी त्यांचे बोलणे स्वीकारले. पण रमेश पानसे यांचे आणखी एक वैशिष्ट्य आहे, ते म्हणजे वाट दाखवायची आणि 'जा तिथून चालत' असं सांगायचं. माझ्याही बाबतीत तेच झालं. आणि "अंमळनेरच्या आसपासच्या एका खेड्यात तुला जायचं आहे. नीलिमा मिश्रा नावाची एक बहादूर मुलगी तुला भेटेल. तिला जाऊन भेटायचं. तिच्याशी बोलायचं, वेळ पडली तर मुक्काम करायचा. आणि नीलिमा मिश्राच्या कामाला आणि प्रत्यक्षात नीलिमाला समजून यायचं." पानसे सरांचं हे सांगणं म्हणजे आनंदाचं देणं ठरलं.

एके दुपारी चारच्या सुमारास धुळे-बहाद्दरपूर रस्त्याला गाडी वळली, तेव्हा आनंदाची घटना म्हणजे कधी नव्हे तो धुवांधार पाऊस कोसळत राहिला. परिसर थंडावला, ओसाड पडलेल्या शेतांच्या अंगावर पाण्याची छोटी-छोटी तळी दिसू लागली. ना डोंगर ना टेकडी, सपाटीच्या रस्त्यांना दुतर्फा असणाऱ्या चऱ्यांतून पाणी खळाळू लागले. सुमारे एक तासाचा हा प्रवाह संपला आणि बहाद्दरपूरची वेस ओलांडताना समोर उभे असणारे पडक्या अवस्थेतले तट-बुरूज समोर उभे ठाकले. ही त्या परिसरातली जुन्या इतिहासाची साक्ष. गावाच्या पश्चिम टोकाला एक सिमेंट कॉंक्रीटची दोन मजल्यांची इमारत समोर दिसू लागली आणि इमारतीच्याच दर्शनी भागातली एक पाटी वाचली. "भगिनी निवेदिता ग्रामीण विज्ञान निकेतन- बाय दि पीपल, फॉर दि पीपल, ऑफ दि पीपल." या फलकानेच या केंद्राच्या कामाचा प्रथम परिचय देण्यास सुरुवात केली. अद्याप रंगाची कोणतीच छटा न ल्यालेल्या इमारतीच्या भोवताली जुन्या-पडक्या वाड्यांच्या इमारती भूतकाळाची साक्ष देण्याच्या तयारीत असल्याचं जाणवलं.

थोडीफार विश्रांती झाली आणि मध्यम बांध्याची, थोड्याफार आधुनिक वेशभूषेतली तिशी ओलांडलेली एक मुलगी समोर आपल्या खास शैलीतून हात जोडत 'नमस्कार' म्हणत पुढे आली. 'नीलिमा मिश्रा'- साक्षात कल्पकता, कर्तृत्व, अखंड प्रयत्न, माहितीचा प्रचंड साठा. आवाजातल्या गोडव्यानंच आपलसं करणारी ही नीलिमा पहिल्याच भेटीत आपल्या अंगीकृत कार्याची पुसटशी ओळख देत राहिली. तिने आपला जीवनप्रवास उलगडण्यास सुरुवात केली. आम्ही टेबलावर समोरासमोर एकमेकांशी बोलत राहिलो. माझ्या मनात असंख्य प्रश्नांची गर्दी होती. त्यामध्ये समान बाब होती, ती जिज्ञासेची-कुतूहलाची. नीलिमा बोलत राहिली. प्रश्नमालिकेतल्या एका एका प्रश्नास ती पुढे सरकवत राहिली. नीलिमाच्या बालपणापासूनच्या मानसिकतेचा पट सुरू झाला.

"याच गावात माझं बालपण गेलं. माझे वडील माध्यमिक शिक्षक. तसं आमचं घराणं बऱ्यापैकी 'धनवान' या विशेषणाशी नातं सांगणारं. वडलांचं वेगळेपण असं, की त्यांनी माझ्या कोणत्याच विचाराला, कृतीला, निर्णयाला नाक मुरडलं नाही, अडथळा आणला नाही. आई थोडीफार जुन्या वळणाचीच, पण मोठ्या मनाची. लहानपणापासूनच्या माझ्या या 'विचित्र' विचारसरणीला तिनं रोखलं नाही, हेच तिचं मोठेपण.

"रोज शाळेच्या वाटेनं जाताना रस्त्याच्या, पायवाटेच्या आजूबाजूच्या जुनाटपणाची-गरिबीची साक्ष देत उभी असलेली कौलारू धाब्याची घरं दिसायची. घरांना आतल्या परिस्थितीस जोडणाऱ्या कमी उंचीच्या चौकटी असायच्या. या घरांसमोर कट्टे बांधलेले आणि त्यांवर सुन्न चेहऱ्यांनी बसलेली माणसं दिसायची. दारांच्या चौकटीतून डोकावणाऱ्या बायका दिसायच्या. अंगणवजा जोत्यावर बांधलेल्या शेळ्या दिसायच्या. डोक्यावर एकावर एक रचलेले पाणी भरून आणलेले हंडे सावरत एकमेकींशी बोलत जाणाऱ्या बायका दिसायच्या. वैभव-संपत्ती-श्रीमंती या शब्दांनी या गावात कधीच प्रवेश केला नाही. या शेतीवर गुजराण करणाऱ्या आणि दारिद्र्याशीच नाळ जोडलेल्या शेतकऱ्यांचे उदास चेहरे आणि आशावादाला पारख्या झालेल्या नजरा दिसायच्या." नीलिमा आपले बालपण कथन करत होती, पण ती सांगताना प्रत्यक्षात त्या क्षणी ते जगतच होती, याची जाणीव मला सातत्यानं होत राहिली. शाळेच्या रस्त्यानं जा-ये करतानाच नीलिमाच्या मनात कमालीची उलघाल व्हायची. ही जिवंत माणसं






जगण्याची उमेदच गमावून बसल्याची जाणीव तिला देत राहायची. बेचैन मनानं घराकडे येत राहिलेली नीलिमा या दरिद्री माणसांच्या भेसूर अवस्थेच्या चिंतेतच गुंतून राहायची. पण इतक्या छोट्या म्हणजे १२/१३ वर्षाच्या बालवयात आपलं जीवितकार्य ठरवणं, या ग्रामस्थांच्या भोवतालचा गरिबी-दारिद्र्याचा दाटलेला अंधार कमी करणं, त्यांच्यात आशावाद जागवणं, त्यांच्या गोठलेल्या मनांत ऊर्जा देणं, अशा कल्पनांनी नीलिमाच्या मनात घर करायला सुरुवात केली. हे फक्त तिलाच कळत होतं. आणि एक दिवशी शाळेतून घराकडे येतानाच नीलिमाने मनात अत्यंत ठामपणानं आपल्या आई-वडिलांशी बोलायचं निश्चित केलं.

नीलिमा आई-वडिलांना म्हणाली, "मी लग्नच करणार नाही. पुरं आयुष्य या गावच्या लोकांसाठी घालवणार ! मला माझ्या आयुष्याचा प्रवास याच रस्त्याने करायचा आहे." जन्मदात्यांना नीलिमाच्या स्वभावाची चांगलीच ओळख होती, पण त्या उभयतांचं मोठेपण यात होतं की, त्यांनी हटकलं नाही, त्यांना खटकलं नाही, त्यांनी "ठीक आहे" या दोनच शब्दांनी संमती दिली. नीलिमाचा हा निर्णय तिनं पक्का केला, तेव्हा ती होती फक्त १३ वर्षांची. नीलिमाने हा निर्णय घेतानाची घटना मला सांगितली आणि मग म्हणाली, "आता अंधार दाटतोय. विश्रांती घ्या. सकाळी गावात चक्कर टाका. माणसांशी-महिलांशी बोला. आमचं सुरू असणारं काम समजून घ्या." नीलिमाने निरोप घेतला आणि ती तिच्या कार्यालयीन कामासाठी निघून गेली. अद्याप पूर्ण काळोख दाटायला वेळ होता म्हणून रस्त्याच्या दुसऱ्या बाजूलाच असलेल्या घराकडे मी माझी पावलं वळवली. नीलिमाच्या आई-वडिलांनी स्वागत केलं. नुकतेच निवृत्त झालेले वडील नीलिमाची जीवनकथा सांगू लागले. त्यात अभिमान होता, आनंद होता; पण त्याचबरोबर हळूहळू काळजीचे शब्दही येत होते. वडील म्हणाले, "नीलिमाशी गप्पा मारा. मुलगी हुशार आहे, धडपडी आहे, जिद्दी आहे, निर्णयाची पक्की आहे. माणसं जोडणारी आहे. अत्यंत कल्पक आहे पण ठाम विचारांची आहे. निर्णय घ्यायला वेळ लावते, पण घेतलेल्या निर्णयाची पूर्ण तयारी असते. खोलवर विचार करते. ती स्वत:साठी जगतच नाही."

एवढं बोलून झालं आणि वडील म्हणाले, "नीलिमाला सांगा, ती तुमचं ऐकेल. म्हणावं- तब्येत सांभाळ. अलीकडे तिला थोडा त्रास होतोय." वडिलांनी बोलणं थांबवलं. आणि नीलिमाच्या आईनं स्वागताचा नमस्कार केला. आता वडील नीलिमाच्या आईविषयी–स्वत:च्या पत्नीविषयी- बोलू लागले. "आमच्या बायकोनं आता साठी ओलांडली. आमचं लग्न तसं लवकरच झालेलं. पण गम्मत बघा, आज चाळीस वर्षं होत आली, नीलिमाची आई गावातल्या गोरगरीब, अपंग, विधवा, निराधार बायकांना सकाळ-संध्याकाळ जेऊ-खाऊ घालते. आपण कमी खाते, पण जे घरात तेच दारात. स्वत: स्वयंपाक करते. जेवण तयार करते आणि गावच्या अशा बायकांना जगवते. तुम्ही संध्याकाळी जे जेवणार आहात, तेच अन्न या बायकांसाठी असणार. आमच्या बायकोला यातच आनंद वाटतो. ती मात्र कधीच उपकाराची भाषा बोलत नाही." स्वत: जगताना इतरांनाही तसंच जगवण्यात नीलिमाच्या आई-वडिलांचा आनंद भरून उरला आहे. समाजात अशीपण माणसं आहेत, म्हणूनच हा समाज चालला आहे. नवीन अनुभवाची साक्ष मिळाल्याचे समाधान मनात साठवत राहिलो आणि त्या दोघांचा निरोप घेऊन विश्रांतीसाठी कार्यालयातील गेस्ट हाउसमध्ये शिरलो. रात्रभर या विलक्षण, वाट सोडून जगणाऱ्या कुटुंबातील माणसांची बोलणी मनाशी बोलत राहिलो.

दुसऱ्या दिवसाची सकाळ ! वेळ नऊची. 'भगिनी निवेदिता ग्रामीण विज्ञान निकेतन'च्या कार्यालयात महिलांचा वावर सुरू झाला. साफ-सफाई हा स्वावलंबनाचाच भाग ! ना कोणी सेवक ना कोणी मालक. कार्यकर्ते तेच आणि संस्थेचा कारभार पाहणारे तेच. स्वयंरोजगार योजनेपाठीमागचे तत्त्व नीलिमाने पूर्णपणे पचवलेले. जीवनावश्यक विविध वस्तूंच्या निर्मितीचे तांत्रिक आणि कौशल्याचे प्रशिक्षण घेतलेल्या महिला एकत्र झालेल्या. त्यांच्याबरोबर चार-सहा पुरुषकार्यकर्ते उपस्थित ! कार्यालयाच्या मोकळ्या जागेत चौकोनी आकारात बसलेली ही युवक-युवती कार्यकर्तेमंडळी अत्यंत आश्वासक नजरेने या निर्मितिकार्याकडे पाहणारी वाटली. नीलिमा माझ्याकडे आली. दिवसाच्या कार्याची सुरुवात प्रार्थनेने करायची ही इथली शिस्त ! दोघेपण कार्यकर्त्यांच्याच ओळींमध्ये

सामील झालो. मौन झाले! ओंकार झाला. मनाने माणसं समोरच्या कार्यात गुंतण्याची तयारी करू लागली. अन् अचानक ग्रामगीतेतल्या अध्यायवाचनास सामुदायिक रीत्या आरंभ झाला. स्पष्ट-शुद्ध उच्चारात गायली जात असलेली ग्रामगीता उपस्थित स्त्री-पुरुषांना समजली असल्याची जाणीव झाली. तो अध्याय पूर्णतः प्रयत्नवादास वाहिलेला होता. निष्क्रियतेवर टीका करणारा, त्यातील धोके आणि तोटे दाखविणारा, अर्थाशी एकरूप झाल्याचे जाणवत होते. अंधश्रद्धेवरचे शाब्दिक प्रहार त्यांच्या वाचनातून स्पष्ट होत होते, अध्यायवाचन संपले. नीलिमाने मानवतेचे महत्त्व सांगणारी हिंदी प्रार्थना म्हणण्यास सुरुवात केली. उपस्थितांनी प्रत्येक ओळ नीलिमाच्या सांगण्यानुसार म्हटली! मने प्रफुल्लित झाली. दिवसाच्या कार्याचा आरंभ झाला. जो तो आपल्या कामाकडे वळला.

नीलिमा कार्यालयातील महिलांनी तयार केलेल्या प्रत्येक वस्तूची ओळख करून देत होती. त्या वस्तूमध्ये कोणते घटक आहेत, त्याचा मानवी शरीरास कोणता उपयोग आहे, या पदार्थांच्या निर्मितिप्रक्रियेतील महिलांचे कौशल्य काय, त्यासाठी त्यांना खर्च करावा लागणारा वेळ, कोणत्या तयार वस्तूंचे पॅकिंग कसे होते आणि या सर्वांबरोबरच परिसरातील लोकांच्या आवडी-निवडी लक्षात घेऊन त्याचे अर्थशास्त्र कसे तयार केलेले आहे, हे नीलिमा तपशिलाने सांगत राहिली. कापडाच्या, चामड्याच्या, परिसरातील अन्य निसर्गदत्त वस्तूंपासून तयार केलेल्या वस्तूंचा तपशील सांगतानाच त्या वस्तू बाजारापर्यंत कशा जातात आणि पैसाविनिमय कसा होतो, याची आकडेवारी नीलिमाने सांगितली. तिने स्थानिक महिलांच्या हाताला काम दिले, त्यांच्यात असणारे अंगभूत कौशल्य विविध वस्तूंच्या निर्मितीसाठी वापरले, त्यांना बाजारातील व्यवहार समजावून दिले आणि याचबरोबर महिलांकडे असणारी निर्मितिऊर्जा वस्तुनिर्मितीसाठी वापरली. नीलिमाने महिलांना स्वतंत्रपणे जगण्याची क्षमता दिली. त्यांच्यात आत्मनिर्भरता वाढविली. माजघरात दडलेली महिला बाह्य जगातील व्यवहार समजू लागली. बाजारातील भाषा, संस्कृती, व्यवहार, आत्मसात करू लागली. महिलांना धाडस दिलं, एवढंच नव्हे तर स्थानिक महिलांना थेट जिल्हास्तरावरची बाजारपेठेची वाट दाखविली. खरेदी-विक्री व्यवहारांचे स्वतंत्र ज्ञान दिलं. आज बहाद्दरपूरच्या महिला दैनंदिन गरजांच्या वस्तुनिर्मितीसाठी बाजारपेठेशी व्यवहार करून कच्च्या मालाची स्वतंत्रपणे खरेदी करतात. त्यामध्ये स्वतःचे कौशल्य, क्षमता, दृष्टी या सर्वांचा वापर करून तयार वस्तूंना बाजारपेठेपर्यंत नेण्याची यंत्रणा हाताळतात. नीलिमाचे हे वेगळेपण मला मनापासून स्वीकारार्ह वाटले.

नीलिमाने आता स्वतंत्रपणे आणखी काही गोष्टी बोलण्याचे ठरविले आणि आम्ही पुन्हा स्वतंत्र खोलीत टेबलाच्या दोन्ही बाजूंस स्थानापन्न झालो. नीलिमा आता पुन्हा आपल्या जीवनप्रवासाकडे वळली. माध्यमिक शिक्षण पूर्ण केल्यानंतर पुण्यासारख्या विद्येच्या माहेरघराकडे जाण्यास ती निघाली. महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण केले. पदव्युत्तर शिक्षणासाठी मानसशास्त्र विषय निवडला. क्लिनिकल सायकॉलॉजीमध्ये प्रथमश्रेणी प्राप्त केली. लौकिक अर्थाने आवश्यक त्या शिक्षणाच्या सर्व पायऱ्या चढून झाल्या. मनास सामाजिक कार्याचा, ग्रामविकासाचा विचार सतावतच राहिला. टाटा समाजशास्त्र संस्थेमध्ये समाजकार्याचे वस्तुपाठ घेतले आणि नीलिमा एक दिवशी पाबळच्या विज्ञान आश्रमात दाखल झाली. डॉ. कलबाग यांनी उभ्या केलेल्या या विज्ञान आश्रमाच्या परिसरातील विविध उपक्रमांमध्ये नीलिमाने प्रत्यक्ष सहभाग घेतला. भोवतालच्या खेड्यांचे सर्वेक्षण करण्याच्या निमित्ताने तिला समाजाची आणखी जवळून ओळख झाली. समस्यांची वादळे समोर घोंघावत राहिली. खचलेला, निराशेच्या गर्तेत अडकलेला माणूस दिसू लागला. त्यांच्यात ऊर्जा आहे पण वापरण्याची दिशा नाही; परिस्थिती आणि परंपरा यांच्या कचाट्यात अडकलेला ग्रामीण माणूस अडखळतो आहे, दबकतो आहे, ठेचकाळतो आहे, हे नीलिमाने प्रत्यक्ष पाहिले. आणि विचारचक्राला गती आली. समस्यांची वादळे आपणास कार्यरत राहण्यासाठी गतिशील करतात हे तिला कळले. माणसात नवनिर्मितीची आच आहे, पण संधी नाही हे तिने अनुभवले. पाबळच्या विज्ञान आश्रमात विचार आणि कौशल्य यांच्या साहाय्याने नवनिर्मिती करता येते, आपले जीवन सुखी करण्याचे मार्ग शोधता येतात, विज्ञान-तंत्रज्ञान आपल्याला साहाय्यभूत ठरते, प्रत्येकातच काही क्षमता असतातच, याची साक्ष

तिला पटली. डॉ. कलबाग यांच्या विज्ञाननिष्ठेतून माणसातील विचारशक्तीला कृतीत उतरविण्याचे मार्ग कसे सापडतात, हे तिने अनुभवले. तिच्यासमोर विविध कार्यांची जंत्री डॉ. कलबाग यांनी टाकली. नीलिमा कार्यरत झाली. तिच्या कार्याचे, निर्मितीचे, नियोजनातील नेमकेपणाचे, शिस्तीचे मूल्यमापन करण्याची जबाबदारी रमेश पानसे यांनी स्वीकारली. विचारांची ओळख विचारातून-आचारातून झाली. मनातल्या कार्याच्या कल्पनांना साकार करण्याचे मार्ग सापडू लागले. सहा-सात वर्षांचा काळ पुढे सरकला. अन् विज्ञान आश्रमाला मूर्तरूप देणारे डॉ. कलबाग यांचे निधन झाले. नीलिमा मिश्रा ही धडपडणारी मुलगी पुन्हा बेचैन झाली, आश्रमात मन रमेनासे झाले. दिशा पुसट होऊ लागल्या. सैरभैर मनाने नीलिमा रमेश पानसे यांच्या पुणे येथील ग्राममंगलच्या कार्यालयात दाखल झाली. मनात जे साठले होते, ते तिने पानसे यांच्यापुढे रिते केले. दिवस सरकत राहिले. रमेश पानसे यांना नीलिमा नवनिर्मितीच्या विचारचक्रात अडकवत राहिली. आणि अचानक एक दिवस रमेश पानसे म्हणाले, "तुझे कार्यक्षेत्र तुझेच गाव– बहाद्दरपूर निश्चित करू. मी तुझ्या पाठीशी आहे." विचार मिळाला. दिशा मिळाली. साहाय्यासाठी पानसे यांनी मित्रमंडळींना आवाहन केले. नीलिमा स्वगृही-स्वग्रामी बहाद्दरपूरमध्ये पाय रोवून उभी राहिली.

हा सर्व प्रवास सांगताना नीलिमा क्षणभर बोलेनाशी व्हायची. मला हे आठवत नाही, क्षणभर थांबूया असं म्हणत राहिली. आणि पुन्हा आपल्या प्रवासाची वाट सांगत राहिली. नीलिमाने आपल्या जीवनकार्याची अत्यंत विचारपूर्वक आखणी केली. पहिला निर्णय होता तो संसारात न गुंतण्याचा, दुसरा होता ग्रामविकासाचा, तिसरा होता महिलांना स्वनिर्मितीची दिशा देण्याचा, चौथा होता परिसरातील शेतकऱ्यांच्या कर्जबाजारीपणाने त्यांच्या गळ्यास आवळणारा दोरीचा फास सोडवण्याचा, पाचवा होता जमिनीच्या उत्पादनक्षमतेची चाचपणी करण्याचा, सहावा होता विस्कळीत महिलांचे संघटन करण्याचा, सातवा होता शेतकऱ्यांना शेतीसाठी अर्थसाहाय्य देणाऱ्या योजना तयार करण्याचा, आठवा होता पारंपरिक शेतीस फाटा देऊन नवतंत्रज्ञान वापरण्याचा, नववा होता महिलांचे बचतगट तयार करून त्यांचे बाजारपेठेशी नाते जोडण्याचा, दहावा होता धुळे-नंदूरबार परिसरातील आदिवासी-कातकरी समाजाला सावकारी पाशातून मुक्त करण्याचा, अकरावा होता ग्रामीण महिलांच्या आरोग्यरक्षणाचा, बारावा होता ग्रामस्थांना स्वयंनिर्णय घेण्यासाठी उद्युक्त करण्याचा, तेरावा होता परिसरातील युवकांना विज्ञान-तंत्रज्ञानाशी जोडण्याचा, चौदावा होता पशुधनाच्या माध्यमातून व्यवसायात विविधता आणण्याचा, पंधरावा होता निर्व्यसनी करण्याचा, सोळावा होता ग्रामआरोग्याचा. अशा विविध विचारांचे मोहोळ घेऊनच नीलिमा बहाद्दरपुरास परतली. ज्याला काम करण्याची इच्छा आणि क्षमता आहे, त्याला आत्मनिर्भरतेसाठी संधी देणे, हे नीलिमाने स्वकार्याचे ध्येय निश्चित केले आणि उपक्रमांची आखणी केली. तिचे प्रत्येक काम उद्दिष्टांनुसार आखणी केलेले असल्याचे जाणवले.

गेल्या आठ-दहा वर्षांतल्या काळात काय घडलं, याचा तपशील ऐकताना नीलिमाच्या कार्यकुशलतेचे कौतुकच वाटले. तिने महिलांचे बचतगट तयार केले, त्यांची संख्या चारअंकी झाली. तिने मायक्रो फायनान्स सिस्टिम तयार केली. महिलांच्या हाती पैसा दिला. पुरुषांसाठी शेतीकर्जाची योजना तयार केली. कर्ज-मंजुरीसाठी ग्रामनिधीतून ग्रामसभेनेच पैशाचे वाटप करण्याचे धोरण राबविले. व्यसनी व्यक्तीच्या घरास कर्ज-अर्थसाहाय्य नाकाराण्याचे अधिकार ग्रामसभेस दिले. कर्जधारकाच्या घरात शौचालयाची सक्ती केली. कर्जधारकास वृक्षसंगोपनाची सक्ती केली. शेतकऱ्यांना एक लाख रुपयांपर्यंत कर्ज देण्यासाठी निधी उभारला. बँकांशी संपर्क साधला. कर्जहप्ते भरण्यासाठी एक विलक्षण मार्ग शोधला. बचत गटांतील असमर्थ कर्जधारकाचा हप्ता उर्वरित सभासदांनी भरण्याची योजना तयार केली. त्यामुळे कर्जाची शंभर टक्के वसुली होत राहिली. परिसरातील खेड्या-पाड्यांपर्यंत योजना पोचली. चाळीस कार्यकर्त्यांचा संच तयार केला. प्रत्येक ग्रामस्थाला गाव आपले वाटत राहिले. सामुदायिक जबाबदारीचा विचार समजावला. महिलांना घराच्या अंधारकोठडीतून उजेडात आणले. दोन हजाराहून अधिक गट तयार केले. गावांतील तरुण मुला-मुलींना संगणकाचे शिक्षण दिले. दुग्धव्यवसायाची

वाट दाखविली. कार्यालयात येणारी व्यक्ती फक्त स्वतःच्या कामासंबंधातच बोलेल, यासाठी वेगळी शिस्त राबवली. प्रत्येक कृतीची स्वतंत्र सिस्टीम तयार केली. महिलांना फावल्या वेळेत विविध पदार्थनिर्मितीची दृष्टी दिली. त्यासाठी बाजारपेठ दाखविली. अर्थव्यवहारात स्वच्छता आणली. कलाविकासास दिशा दिली. आसपासच्या गावांशी, व्यापाऱ्यांशी, ग्राहकांशी संबंध ठेवून विश्वासाचे वातावरण निर्माण केले. गोधड्यानिर्मितीसाठी परदेशी बाजारपेठेची आखणी केली. बांधकामव्यवसायातील धडे दिले आणि हे सर्व करताना गावाच्या मूळ संस्कृतीस अत्यंत जाणीवपूर्वक जोपासले.

नीलिमा आपल्या विविध योजनांविषयी गावातील पुरुष व महिलांशी अत्यंत मोकळेपणाने बोलत राहिली. त्यातून त्यांच्यातील आत्मविश्वास जागृत झाला. आपण समर्थपणे जगू शकतो, ही आशा पल्लवित झाली. संघटनावृत्ती बळावली. गावाचे गावपण टिकून राहिले. स्वावलंबनाचे धडे गिरविले गेले.

नीलिमाने यामध्ये एक पथ्य पाळले असल्याचे तिच्या बोलण्यातून स्पष्ट झाले. कोणतीही शासकीय योजना ग्रामविकासासाठी स्वीकारायची नाही, शासनातील भ्रष्टाचारी वृत्ती गावापर्यंत फिरकू द्यायची नाही. कोणतेही शासकीय अनुदान स्वीकारायचे नाही आणि कोणत्याही विकास योजनेला कसल्याच राजकीय विचारांचा स्पर्श होणार नाही, याची दखल घ्यायची. नीलिमा यात यशस्वी ठरली आहे. गावाचा तिच्यावर कमालीचा विश्वास आहे. ती संपूर्ण गावाची 'दीदी' आहे. लोक तिच्याकडून नवनवीन उपक्रम, योजना समजावून घेण्यासाठी उत्सुक असल्याची साक्ष लोकांशी झालेल्या बोलण्यातून मला मिळाली.

नीलिमाच्या पाठीशी विचारांनी डॉ. कलबाग, रमेश पानसे जसे उभे राहिले, तसे केअरिंग फ्रेंड्स संस्थेचे रमेश कचोलिया आणि निमेश शाह, यांच्याचबरोबर के. एस. वाणी मेमोरिअल ट्रस्टचे जगन्नाथ वाणी आणि गजानन महाराज ट्रस्टचे पदाधिकारी सक्रिय हाताने उभे राहिले आहेत. आपल्या आई-वडिलांपासून पाठीशी विचाराने आणि कृतीने उभ्या राहिलेल्या सर्वांच्याचबद्दल नीलिमाच्या मनात आदर भरून आहे. तिला त्या सर्वांबद्दल कृतज्ञता वाटते. आपल्या श्रेयात एकटेपण नाही, हे ती कबूल करते. युवक-युवतींची इच्छा आणि कार्यशक्ती हेच आपले बळ आहे, असे स्पष्ट करताना पुढील २७ वर्षांचा विकास आराखडा आपल्यापाशी असल्याचे सांगून स्वतःचे दूरद्रष्टेपण नीलिमा सूचित करते. यातून ती मॅगसेसे पुरस्काराची मानकरी ठरली, जगाच्या नकाशावर बहाद्दरपूरला तिने पोचविले.

नीलिमा मिश्राच्या या कार्यकर्तृत्वासाठी एकच भाव शिल्लक राहतो, "नीलिमा, तुला सलाम!"

ଔଔଔ

---








# जागतिकीकरणाचा शिक्षणक्षेत्रावरील परिणाम

प्रा. डॉ. पंडितराव पवार

**प्रास्ताविक :**

१९९१ च्या दरम्यान आपल्या देशाची आर्थिक स्थिती बिघडली. देशावर आलेल्या आर्थिक अरिष्टामुळे देशातील उपलब्ध सोने गहाण ठेवून देशाची आर्थिक पत सांभाळावी लागली. आणि त्या प्राप्त परिस्थितीत आपल्या देशाने खुले आर्थिक धोरण स्वीकारून गतिमान अर्थव्यवस्थेकडे वाटचाल सुरू केली. त्यामुळे रखडलेला विकासदर ३.५ टक्क्यावरून १९९२ ते २००२ या दशकात सहा टक्क्यांपर्यंत पोचल्याने भारताची वाटचाल महासत्तेकडे सुरू झाली, असे अर्थतज्ञ म्हणू लागले. याच वेळी युरोपातील 'युरोझोन' आणि अमेरिकेतील 'सबप्राइम' या आर्थिक संकटातून जागतिक मंदीची लाट निर्माण झाली आहे. आपल्या देशातही परिणामस्वरूप चलन-फुगवट्यातून आलेल्या मंदीतून मार्ग काढण्यासाठी विविध क्षेत्रांतील खाजगीकरणाचे मार्ग अवलंबिले जात आहेत.

**जागतिकीकरणाची (Globalisation) संकल्पना**

एखाद्या विकसनशील देशाची अर्थव्यवस्था जागतिक अर्थकारणाशी जोडणे म्हणजे त्या देशाच्या अर्थव्यवस्थेचे जागतिकीकरण म्हणता येईल. भारताने परकीय गुंतवणुकीसाठी आपल्या अर्थव्यवस्थेची दारे खुली करून खाजगीकरणास वाव देण्यास सुरुवात केली. त्यामुळे विविध देशांतील कंपन्यांचा प्रवेश सुकर झाला. त्याचप्रमाणे आपला देशही परदेशांत गुंतवणूक करण्यास पुढे येऊ लागला. आयातीवरील बंधने सैल करून निर्यातीच्या बाबतीत विनिमयदरात काही बंधने आणली. अशा रीतीने १९९१ पासून जागतिकीकरण, उदारीकरण आणि खाजगीकरण हे शब्द प्रसारमाध्यमे आणि व्यापारी औद्योगिक आस्थापनात प्रामुख्याने चर्चिले जाऊ लागले. त्याचा अपरिहार्य परिणाम म्हणजे भारत सरकारने व्यापार, शिक्षणक्षेत्र, शेती, पर्यटन इत्यादी क्षेत्रांतील आपले अंग हळूहळू काढून घेऊन खाजगीकरणास अधिक वाव दिला. त्यातच १९९४ साली भारत सरकारने 'डंकेल' प्रस्ताव मान्य करून स्वाक्षरी केली. त्यातील मसुद्यानुसार जागतिक स्तरावर जग एक व्यापक बाजारपेठ असून त्यातील कृत्रिम बंधने तोडून मुक्तद्वार धोरणाचा अवलंब करण्यात आला.

**गॅट कराराचा प्रभाव :**

भारतात ब्रिटिश काळापर्यंत देशाशी सुसंगत अशी शिक्षणप्रणाली सुरू होती. ब्रिटिशांनी आपल्या ध्येय-धोरणानुसार त्यांच्या सोयीची शिक्षणपद्धती सुरू केली. त्यात व्यक्तिविकासापेक्षा कारकुनी शिक्षणप्रणालीला महत्त्व दिले गेले. स्वातंत्र्यानंतर मात्र आपल्या शासनाने आपल्या देशाच्या गरजा ओळखून त्यासाठी शिक्षणतज्ञांच्या समित्या-आयोग नेमून आपल्या शिक्षणप्रणालीत आमूलाग्र बदल केलेत. काळाच्या ओघात शासनाने आपली शैक्षणिक धोरणे ठरवून ती राबविण्याचा प्रयत्न केला. आजच्या गतिमान आणि विज्ञानाच्या युगात विविध क्षेत्रांतील स्पर्धेत यशस्वी होण्यासाठी अभ्यासक्रम आखण्यात येऊ लागले. संगणक, माहिती-तंत्रज्ञान यांचा वापरही शिक्षणात मोठ्या प्रमाणावर होऊ लागला. आजतर जागतिकीकरण, उदारीकरण आणि खुली अर्थव्यवस्था यांमुळे जागतिक पातळीवरील विविध क्षेत्रांतील प्रचंड स्पर्धा सामान्य माणसाच्या जीवनापर्यंत पोचली आहे. त्यातूनच व्यापार आणि अन्य क्षेत्रांचे नियंत्रण करणारा 'गॅट करार' (General Agreement on Trade in Services) अस्तित्वात आला. खरेतर हा करार १९४७ मध्येच प्रस्तावित होता. नंतर तो केवळ विकसित देशांपुरताच मर्यादित होता. परंतु त्याची व्याप्ती १९८६ साली वाढवून कृषिउत्पादन व व्यापारवृद्धी, संपदेचा हक्क (पेटंट), गुंतवणूक व सेवाक्षेत्रांचा त्यात समावेश करण्यात आला. त्यानंतर १९९५ मध्ये अविकसित देशांसाठीही तो अस्तित्वात आला. आणि १९९६ पासून त्याची अंमलबजावणी सुरू झाली. विकसित आणि विकसनशील देशांच्या आर्थिक विकासासाठी प्राधान्याने या कराराची










अंमलबजावणी करण्याचे धोरण ठरविण्यात आले. जागतिक व्यापार संघटनानुसार (WTO) वस्तूंचा वापर आणि सेवेची किंमत या बाबी प्रमुख मानल्या आहेत.

गॅट करारानुसार जागतिक पातळीवर गुणवत्ताधारक सेवा देणाऱ्या संस्था एकमेकांच्या सहकार्याने आर्थिक विकासाची प्रक्रिया राबवू शकतात. हा करार व्यापार, संपर्कमाध्यमे, रचनात्मक आणि अभियांत्रिकी क्षेत्र, वितरण, शिक्षण आणि आर्थिक व्यवहार, आरोग्य, पर्यटन, दळणवळण, सांस्कृतिक आणि क्रीडाविषयक उपक्रम इत्यादी बारा सेवाक्षेत्रांशी निगडित करण्यात आला आहे.

**जागतिकीकरण आणि शिक्षणक्षेत्र - अनुबंध :**

'गॅट' करारांतर्गत खुल्या अर्थव्यवस्थेप्रमाणे शिक्षणाचेही गुणात्मक मूल्य ठरवून ते व्यापारी क्षेत्र म्हणून संबोधले गेले. त्यानुसार विद्यार्थी हा संस्था-चालकांच्या दृष्टीने ग्राहक ठरणार आहे. त्याला गुणवत्तापूर्ण शिक्षण देण्याचे बंधन संस्थांवर असून बाजारातील इतर वस्तूंप्रमाणेच विद्यार्थीही वितरणयोग्य वस्तूंत समाविष्ट आहे. एकंदरीत गुणवत्तापूर्ण बौद्धिक उत्पादनानुसार विद्यार्थ्यास जागतिक स्पर्धेत मागणी राहील. त्याने दिलेल्या शुल्काच्या मोबदल्यात त्याला शिक्षण मिळाले नाही, तर तो कायदेशीर कारवाई करू शकतो. कारण गॅट करारातच तशी तरतूद आहे.

'गॅट' करारानुसार शैक्षणिक क्षेत्रावर खालीलप्रमाणे दृश्य आणि अदृश्य स्वरूपांत परिणाम दिसू लागले.

१) शासकीय अनुदानात हळूहळू कपात आणि खाजगीकरणाला प्रोत्साहन.
२) देशांतर्गत शैक्षणिक संस्थांत बौद्धिक देवाण-घेवाण आणि स्पर्धेला उत्तेजन.
३) पारंपरिक अभ्यासक्रमांऐवजी विविध व्यावसायिक अभ्यासक्रमांचे पर्याय.
४) गुणवत्ताधारक विद्यार्थ्यांना जागतिक पातळीवर सेवेच्या संधी उपलब्ध.
५) भौतिक सुविधांत सुधारणा करण्याच्या संधी.
६) सातत्याने गुणवत्तेसाठी सतर्क राहून प्रयत्नांची पराकाष्ठा.
७) पर्याप्त (Optimum) व्यापारीकरणास वाव.
८) माहिती-तंत्रज्ञानाच्या जास्तीत जास्त वापरावर भर.
९) विद्यार्थ्यांना अधिकाधिक सेवा देण्याच्या प्रवृत्तीस महत्त्व.
१०) पारंपरिक शिक्षणाऐवजी मुक्त आणि दूरशिक्षण प्रणालीला स्थान.

वरीलसारखी उद्दिष्टे आणि पर्यायाने फायदे गॅट करारातून दिसतात. मात्र 'गॅट' करारात समाविष्ट असणाऱ्या देशांनाच हे फायदे मिळतील, अशीही अट त्यात आहे. सर्वच संबंधित राष्ट्रांवर 'पारदर्शी' आणि 'मुक्त व्यापार' यांची बांधिलकी पाळण्याचे बंधन आहे.

जागतिकीकरणातील खाजगीकरणाच्या तत्त्वामुळे आपल्या शासनाने हळूहळू शिक्षणक्षेत्रातील आर्थिक पाठबळ काढून खाजगीकरणास वाव देण्यास सुरुवात केली आहे. वास्तविक महाराष्ट्र शासनाने तर वसंतरावदादा पाटील मुख्यमंत्री असताना १९८३ पासूनच विनाअनुदान अभियांत्रिकी-वैद्यकीय अभ्यासक्रमांना परवानगी देऊन खाजगीकरणाचा श्रीगणेशा केला होता. त्यानंतर गेल्या १०-१५ वर्षांत तर खाजगी प्राथमिक विशेषतः इंग्रजी माध्यमाच्या शाळा, तांत्रिक-व्यावसायिक अभ्यासक्रमांची महाविद्यालये, व्यवस्थापन संस्था यांची फार मोठ्या प्रमाणात स्थापना झाली. अनेक संस्थाचालकांनी अशा संस्था स्थापन करून ते शिक्षणमहर्षी ते शिक्षणसम्राट झालेले दिसतात. कर्नाटक शासनानेही यापूर्वी अशा खाजगीकरणास सुरुवात केली होती. त्यामुळे महाराष्ट्र व शेजारील राज्यातील श्रीमंत वर्गातील विद्यार्थी तेथे जाऊन व्यावसायिक शिक्षण घेत होते. आता महाराष्ट्रानेही खाजगीकरणाकडे वेगवान वाटचाल सुरू केल्याने ज्या गुणवंत विद्यार्थ्यांना शासकीय व्यावसायिक महाविद्यालयात-व्यवस्थापन संस्थांत मर्यादित जागांमुळे प्रवेश मिळत नव्हता, अशा श्रीमंत-मध्यमवर्गीय विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणाच्या संधी प्राप्त झाल्या. शासनाने शैक्षणिक शुल्कनिश्चितीसाठी समिती स्थापून राखीव जागांवरील विद्यार्थ्यांनाही नियमाप्रमाणे प्रवेश देण्याचे पुढेपुढे निर्देश दिल्याने समाजातील वंचित घटकांनाही या खाजगीकरणाचा फायदा काही प्रमाणात झाला. संस्थेने पुरविलेल्या भौतिक सुविधा, सेवकांवरील आणि प्रशासकीय खर्च या फीमधून








आणि संस्थांतर्गत २०% विद्यार्थ्यांकडून संस्थेच्या धोरणाप्रमाणे शुल्क घेऊन त्यातून भागविण्याची अपेक्षा शासनाची आहे. अशा परिस्थितीत अनेक राजकीय नेते आपल्या प्रभावाने खाजगी महाविद्यालये आणि अभिमत विद्यापीठेही सुरू करण्यास पुढे येत आहेत. त्यांना शासनही सवलतीच्या दरात शासकीय जमिनी आणि इतर सवलती देत आहे. त्यामुळे शहरी भागांप्रमाणेच ग्रामीण आणि आदिवासी भागांपर्यंत हे खाजगीकरणातील शिक्षण पोचत आहे. समानतेच्या न्यायानुसार सामाजिक विकासासाठी हे खाजगीकरण फलदायी आहे. जागतिकीकरणाच्या विचारधारेनुसार गुणवत्तावाढीसाठी सर्वदूर खाजगीकरणाचा विचार योग्यच आहे. अमेरिकेसारख्या देशात हार्वर्ड किंवा स्टॅनफोर्डसारखी खाजगी विद्यापीठे दर्जेदार शिक्षण देत आहेत. मात्र आपल्याकडे गुणवत्तेच्या तुलनेत शासकीय आणि खाजगी विद्यापीठेही जागतिक पातळीवर फारशी उंची गाठत नाहीत, ही खंत देशाचे राष्ट्रपती आणि पंतप्रधानही व्यक्त करीत आहेत.

**ज्ञान आणि गुणवत्तासंबंध :**

'ज्ञानाधिष्ठित समाजरचना' आणि 'ज्ञानाधिष्ठित अर्थव्यवस्था' हेच कोणत्याही देशासाठी भविष्यात टिकून राहण्याचे मार्ग आहेत, असे सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ डॉ. रघुनाथ माशेलकर यांचे मत आहे. आज जागतिकीकरणात सर्वत्र प्रचंड स्पर्धा आहे. या स्पर्धेत जो टिकेल, तो यशस्वीपणे जीवनाची वाटचाल करेल, हेच खरे आहे.

ज्ञानप्रक्रियेत विशिष्ट क्षेत्राचा सांख्यिकी किंवा गुणात्मक समुच्चय (Data) ही ज्ञानाची पहिली पायरी असून त्या समुच्चयाचे रूपांतर माहितीत(Information) होऊन त्याला ज्ञानाचा (Knowledge) दर्जा प्राप्त होतो. आणि या ज्ञानाचे शहाणपणात (Wisdom) संक्रमण झाले, तर ते ज्ञान समाजासाठी आणि पर्यायाने देशासाठी उपयुक्त ठरते, अशी सर्वसाधारण मांडणी ज्येष्ठ शास्त्रज्ञ डॉ. रघुनाथ माशेलकरांनी केली आहे.[१] या शहाणपणाचा संबंध आजच्या गतिमानतेशी तारतम्याने जोडून घेण्याशी आहे.

जागतिकीकरणातील स्पर्धेच्या युगांत हे ज्ञान किती कौशल्यपूर्ण वापरले जाते, यावर शिक्षणातील गुणवत्ता ठरत असते. स्पर्धेमध्ये त्या त्या व्यक्तीची क्षमता त्याच्या अंगी असणाऱ्या त्याच्या बलस्थानांवरच अवलंबून असते. प्राप्त युगधर्माशी जमवून घेऊन स्पर्धेत यशस्वी व्हावयाचे असेल, तर गुणयुक्त ज्ञानाधिष्ठित कौशल्यांची गरज आहे. जागतिकीकरणातून अशा ज्ञानाची संपादणूक आणि त्याचे कौशल्यपूर्ण उपयोजन म्हणजे गुणवत्ता होय. आणि अशी गुणवत्ता असणे म्हणजेच जागतिक स्पर्धेत यशस्वी होण्याचा एक चांगला सोपान म्हणता येईल. अशा कौशल्याधिष्ठित गुणवत्तापूर्ण शिक्षणातूनच गुणवत्तापूर्ण निर्यातक्षम विद्यार्थी तयार होणे अपेक्षित आहे. जागतिकीकरणातील शिक्षणातून हीच राष्ट्राची, समाजधुरिणांची आणि शिक्षणतज्ज्ञांची अपेक्षा आहे. बदलत्या परिस्थितीत जगण्यास जे योग्य, तेच काळाच्या ओघात टिकतात. म्हणजेच 'सर्व्हायव्हल ऑफ द फिटेस्ट' हा चार्लस् डॉर्विनचा सिद्धान्तच येथे लागू पडतो, असे म्हणता येईल. आपल्या कौशल्याने प्रतिस्पर्ध्याला मागे टाकणे हाच जंगलचा कायदा जागतिकीकरणातील स्पर्धेत गृहीत आहे. म्हणून गुणवत्तापूर्ण शिक्षण हीच आज काळाची गरज आहे. 'एक्स्पोर्ट क्वालिटी'च्या मालाला जशी जागतिक बाजारपेठेत मागणी असते, त्याच न्यायाने गुणवत्तापूर्ण ज्ञानाधिष्ठित विद्यार्थ्याला जगात कोठेही, कोणत्याही क्षेत्रात केव्हाही मागणी राहील, हा जागतिकीकरणातील ज्ञान आणि गुणवत्तेचा अनुबंध आहे. आजचा विद्यार्थी बौद्धिक दृष्ट्या सक्षम आहे. सुदैवाने त्याला विविध भौतिक सुविधा उपलब्ध होत आहेत. मात्र त्याने चंगळवादापासून दूर राहून चांगल्या शिक्षणसंस्थांतील शैक्षणिक पर्यावरण, ज्ञानसंपन्न प्रयोगशील गुरूजन यांच्या मार्गदर्शनातून स्पर्धेसाठी तत्पर राहण्याची गरज आहे. समाजानेही त्याची ज्ञानाधिष्ठित मानसिकता जोपासण्यासाठी सक्रिय होण्याची अधिक गरज आहे. त्याला मानसिक धीर देऊन जगाच्या बाजारपेठेत यशस्वी होण्यासाठी पालकांनीही सजग राहण्याची आवश्यकता आहे. मग जागतिकीकरण हे शिक्षणक्षेत्राला वरदानच ठरेल, अशी आशा करावयास हरकत नाही. या जागतिकीकरणाच्या स्पर्धेतूनच भारत महासत्तेकडे वाटचाल करू शकेल, असे तज्ज्ञांना वाटते. त्यासाठी ध्येयवादी आणि गुणवंत विद्यार्थ्यांचा सहभाग आवश्यक राहील. या विद्यार्थ्यांना मोठे ध्येय बाळगून त्यासाठी परिश्रमाची








तयारी लागेल. वेळेचे भान ठेवून संयमाने, उदात्त वाटेने वाटचाल करावी लागेल. पालकांचे, समाजाचे आणि देशाचे ऋणही या विद्यार्थ्यांनी विसरू नये, अशी अपेक्षा येथे गृहीत आहे. बाबा आमटे म्हणतात त्याप्रमाणे अशा ध्येयवादी तरुणांनी काळाशी सुसंगत अशा 'योजना भान ठेवून आखून, त्या बेभान होऊन राबविल्या', तर या जागतिकीकरणाच्या स्पर्धेत ते निश्चितपणे यशस्वी होतील, यात शंका नाही. कारण आपल्या देशाला उज्ज्वल शिक्षण-परंपरांचा आणि आदर्शांचा वारसा आहे.

**खाजगीकरणाचे काही तोटे :**

विशेषतः उच्च शिक्षणक्षेत्रात सार्वजनिक आणि खाजगी क्षेत्रांतील सहभाग महत्त्वाचा आहे. परंतु शासनाने शिक्षणक्षेत्रातील आपला सहभाग हळूहळू कमी करून खाजगीकरणास वाव दिला. विनाअनुदानित शाळा-महाविद्यालये मागा पण अनुदान मागू नका, ही शासनाची भूमिका भविष्याच्या दृष्टीने चिंतेची बाब ठरू शकते. यापूर्वी आणि आजही काही खाजगी शिक्षणसंस्थांनी-संस्थाचालकांनी मोठेच योगदान दिले आहे. पण ध्येयवादी शिक्षणसंस्थांची संख्या कमीकमी होताना दिसत आहे. त्याऐवजी राजकीय प्रभाव असणारी मंडळी पुढे येऊन शिक्षणसंस्था काढण्यात पुढाकार घेत आहेत. आणि गुणवत्तापूर्ण शिक्षणाचा व्यवसाय न राहता त्याला नफेखोरीचे स्वरूप प्राप्त होऊन संस्थाचालक शिक्षणसम्राट होऊन राजकारणातून शिक्षणकारण आणि त्यातून राजकारणात वरचष्मा असेही चित्र आज राज्यात-देशात दिसत आहे. याला कही अपवाद जरूर आहेत. 'शिक्षण शुल्क समिती'चे निकष न लावता शिक्षकांची भरती, शैक्षणिक उपक्रमांकडे, भौतिक सुविधांकडे दुर्लक्ष आणि परिणामी विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होते. मान्यता देणाऱ्या संस्था आणि मूल्यमापन करणाऱ्या विद्यापीठांपुढेही अपुरेच चित्र उभे केले जाते. आता-तर स्वयंअर्थसाहाय्यित विद्यापीठांनाही परवानगी देण्याचे धोरण शासनाने ठरविले आहे. त्यामुळे परदेशी खाजगी विद्यापीठांपुढे आपल्या खाजगी संस्था कितपत टिकतील, हाही प्रश्न गुणवत्तेच्या दृष्टीने विचार करण्यासारखा आहे. त्यामुळे शैक्षणिक गुणवत्तेची जागा 'अर्थपूर्ण' बाजार घेईल. त्यामुळे जागतिकीकरणातील शिक्षणाचा हा एक महत्त्वाचा दोष म्हणावा लागेल. अशा खाजगी संस्थांतील शिक्षण गुणवत्तापूर्ण राहण्यासाठी आणि त्यातील पारदर्शकता टिकण्यासाठी अशा खाजगी संस्थांवर मान्यता देणाऱ्या त्या त्या अधिकारमंडळाचे काटेकोर नियंत्रण आणि त्या संस्थांचे वेळोवेळी मूल्यमापन करणे आवश्यक आहे. तरच खाजगीकरणाचे चित्र आश्वासक राहील, असे वाटते.

**समारोप :**

जागतिकीकरणामुळे जग म्हणजे वैश्विक खेडे झाले आहे. मात्र गरीब-श्रीमंत अशी दरी निर्माण होऊन माणसे लांब जात आहेत. शेती, व्यवसाय, पारंपरिक लहान उद्योग हळूहळू नामशेष होत आहेत. संस्कृती हळूहळू आधुनिकतेकडे झेप घेत आहे. 'मॉल' संस्कृतीचा उदय होत आहे. एकंदरीतच जागतिकीकरण माणसाला विनाशाकडे नेत आहे, असेही चित्र दिसत आहे. परंतु गुणवत्तापूर्ण शिक्षणामुळे विद्यार्थ्यांना नोकऱ्या उपलब्ध होतील. खाजगीकरणातून रेंगाळलेली सरकारी कामे लवकर आणि गुणवत्तापूर्ण होतील, ही आशा बाळगायला जागा आहे.

जागतिकीकरणातील व्यापक उद्दिष्टांमुळे अभ्यासक्रमात विविधता, नावीन्य आणि अत्याधुनिक तंत्रज्ञान यांचा समावेश होऊन शिक्षकांनाही आपले ज्ञान अद्ययावत ठेवण्याची संधी मिळेल. देशविदेशांतील शैक्षणिक परिषदांतून ज्ञानाची देवाण-घेवाण करता येईल. त्यामुळे त्यांची ज्ञानाची संपादणूक त्यांची बौद्धिक संपदा ठरणार आहे. त्या ज्ञानाचा उपयोग अपरिहार्यपणे विद्यार्थी, समाज, राष्ट्र यांनाच होईल, असे म्हणावयास वाव आहे.

'जागतिकोकरण आणि शिक्षण' या संदर्भात सुप्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ प्रा. सुधीर पानसे यांनी तरुण आणि शिक्षणाच्या जागतिकीकरणाच्या बाबतीत मौलिक विचार मांडले आहेत. त्यांनीही जागतिकीकरणातील सकारात्मकता विशद करताना लिहिले आहे की, "उच्चशिक्षित तरुण हेच भारताचे बलस्थान आहे. आज अगदी अत्यंत पुढारलेल्या जगात आपले उच्चशिक्षित तरुण अत्यंत तीव्र स्पर्धा असलेल्या अमेरिकेसारख्या देशांमध्ये यशस्वी होत आहेत. याचे कारण हे बलस्थान आपल्या शिक्षणव्यवस्थेत आहे.

जागतिकीकरणाच्या युगात भारत आपले वैशिष्ट्यपूर्ण स्थान निर्माण करून आघाडी घेऊ शकेल, ती केवळ शिक्षणाच्या बळावर." [२] आपल्या पारंपरिक शिक्षण-प्रणालीचा वारसा आणि आजचे माहिती-तंत्रज्ञान यांच्या संयोगातून प्रा. पानसे यांचा आशावाद सयुक्तिक आहे, असे म्हणता येईल.

जागतिकीकरणाचा हा पूर्वार्ध आहे. उत्तरार्धापर्यंत आणखी सुखद किंवा दुःखद अपघातही घडू शकतील, हे काळाच्या ओघातच स्पष्ट होईल.

**संदर्भ :**

१. जागतिकीकरण आणि शिक्षणक्षेत्र - सुधीर पानसे, प्रस्तावना : पृ. ५. लोकवाङ्मयगृह प्रकाशन, मुंबई. ति. आ. २०११.
२. उनि, पृ. ६६.
३. साहित्य आणि शिक्षण - संदर्भ शोध, डॉ. पंडितराव पवार. प्रकाशक : संयोग पब्लिकेशन, नाशिक. प. आ. २००९.

ઉઉઉ

# राज्यघटनेतील गांधीविचार*

न्या. नरेंद्र चपळगावकर

## राज्यघटनेतील गांधीविचार

महात्मा गांधींच्या विचाराप्रमाणे भारतीय राज्यघटनेचे स्वरूप ठरू शकले नाही, असा सर्वसाधारण समज आहे व तो बऱ्याच अंशी खरा आहे. मात्र राज्यघटनेत गांधीविचाराचे काहीही नाही, असे म्हणणे चुकीचे ठरेल. भारताचे स्वातंत्र्य हे घटनात्मक राज्याच्या रूपाने अस्तित्वात आले पाहिजे व ही घटना भारतीयांनीच स्वतः तयार केलेली असली पाहिजे, हा काँग्रेसचा आग्रह होता व गांधीजीच त्या आग्रहाचे प्रवक्ते होते. काँग्रेस संघटना आणि गांधीजी या दोघांनीही नागरिकांच्या मूलभूत अधिकारांबद्दल विशेष आग्रह धरला होता व घटनासमिती अस्तित्वात येण्यापूर्वी सोळा-सतरा वर्षे स्वातंत्र्याची चळवळ चालू असतानाच मूलभूत अधिकारांची स्पष्ट मागणी करणारा व ते कोणकोणते असावेत हेही सांगणारा ठराव अखिल भारतीय राष्ट्रीय काँग्रेसच्या व्यासपीठावरून संमत झाला होता. जवाहरलाल नेहरू आणि महात्मा गांधी हेच उभयता या ठरावाचे निर्माते होते. भारत हे एक धर्मनिरपेक्ष राज्य असेल व या देशात अल्पसंख्याकांना त्यांची संस्कृती आणि धर्म यांच्या रक्षणाचे स्वातंत्र्य असेल, असेही काँग्रेसने आणि गांधीजींनी वेळोवेळी सांगितले होते. सर्व नागरिकांना विकासाचा अधिकार असावा व त्यांना विकासाची समान संधी असावी, हेही काँग्रेसचे जाहीर धोरण होते. प्रौढमताधिकाराचा काँग्रेसने आणि गांधीजींनीही आग्रह धरला होता. प्रौढमताधिकार याचा अर्थ देशातल्या प्रत्येक प्रौढाला मताचा अधिकार असेल व त्या मताच्या द्वारे तो आपल्या प्रतिनिधींची निवड करील असा आहे. विधिमंडळे याचप्रमाणे सरळ निवडणुकीने निवडली जातील, हेही काँग्रेसच्या धोरणात गृहीत होते. काँग्रेसचे हे धोरण अनेक वेळा ठरावांद्वारे, निवेदनांद्वारे आणि इतर मार्गांनी प्रगट झाले होते व गांधीजीही त्या प्रक्रियेत भागीदार होते.

राज्यघटनेतील आणखी दोन महत्त्वाच्या गोष्टींबद्दलचे काही श्रेय गांधीजींना द्यावयास पाहिजे. अस्पृश्यतेसारख्या अमानुष रूढीविरुद्ध लोकजागृती करण्यात महात्मा गांधींचा मोठा सहभाग होता. त्यांच्याच आग्रहामुळे काँग्रेसच्या अस्पृश्यता निवारण कार्याचा समावेश झाला होता. ज्यांना या अमानुषतेची झळ बसत होती, त्या वर्गातून डॉ. आंबेडकरांसारखे नेतेही निर्माण झाले व त्यांनीही चळवळी उभारून संघर्षाला प्रारंभ केला होता. या सर्व गोष्टींचा एकत्रित परिणाम म्हणून अस्पृश्यता ही स्वतंत्र भारतात शिल्लक राहता कामा नये, असे देशमानस बनले. राज्यघटनेत अस्पृश्यता नष्ट करण्यात आली आहे व ती पाळणे हा गुन्हा असेल, असे जाहीर करणारे १७ वे कलम समाविष्ट झालेले आहे. राज्यघटनेच्या प्रास्ताविकात देशातील सर्व नागरिकांना राजकीय, आर्थिक आणि सामाजिक न्यायाचे आश्वासन देण्यात आले आहे. तसेच स्वातंत्र्य, समता आणि बंधुता या मूल्यत्रयीला व्यवस्थेचा आधार मानण्यात आले आहे. या गोष्टी महात्मा गांधी आणि काँग्रेस या दोघांनी आग्रह धरलेल्या आणि स्वातंत्र्याच्या चळवळीत महत्त्वाच्या मानलेल्या होत्या. घटनेत त्यांचा अंतर्भाव होणे याचे श्रेय इतिहास, जगभर झालेली जागृती या सर्वांना तर आहेच; पण त्याचबरोबर ते गांधीजींच्या नेतृत्वालाही दिले पाहिजे.

घटनेतील अशा काही महत्त्वाच्या गोष्टी काँग्रेस पक्षाचे धोरण, स्वातंत्र्याचा लढा आणि गांधीजींचे नेतृत्व यांच्यातून निर्माण झालेल्या असल्या, तरी राज्यघटनेत खेडी हा प्राथमिक व पायाभूत घटक मानणे व त्यांना घटनात्मक अधिकार देणे, त्यांना स्वयंनियोजनाचा आणि

*राजहंस प्रकाशनातर्फे लवकरच प्रसिद्ध होणाऱ्या 'महात्मा गांधी आणि भारतीय राज्यघटना' या पुस्तकातील एक प्रकरण.

अनुक्रमणिका

आपल्या करव्यवस्थेचा अधिकार देणे, यांसारखे गांधीजींचे प्रमुख आग्रह घटनेमध्ये सामील झाले नाहीत. स्वातंत्र्यलढ्यामध्ये महात्मा गांधींचे नेतृत्व काँग्रेस पक्षाने स्वीकारले व त्यांना लढ्याचे मार्गदर्शक मानले. काही वेळा तीव्र मतभेद झाले असूनही त्यांपैकी बहुतेक वेळा त्यांच्याच मताचा आदर केला गेला; असे असतानाही स्वातंत्र्यानंतर देश कोणत्या मार्गाने जावा, याबद्दल धोरण निश्चित करणाऱ्या राज्यघटनेच्या स्वरूपाबद्दल गांधीजींची सर्वच मते घटनासमितीने स्वीकारली नाहीत; एवढेच नव्हे, तर त्या मतांबद्दल गांभीर्यपूर्वक स्वतंत्र चर्चाही केली नाही. देशाचा सर्वोच्च नेता म्हणून गौरविल्या जाणाऱ्या गांधीजींना स्वतंत्र भारताच्या राजकीय व्यवस्थेचे स्वरूप ठरवताना असे बाजूला का सारले गेले? गांधीजींच्या कल्पनेतील ग्रामस्वराज्याधारित देशरचना घटनेत का अंतर्भूत होऊ शकली नाही?

**गांधी आणि नेहरू : दोन भिन्न मार्ग**

स्वतंत्र भारताची राजकीय व आर्थिक समाजरचना कशी असावी, याविषयी महात्मा गांधी आणि जवाहरलाल नेहरू यांच्यात मूलभूत मतभेद होते. शेवटी नेहरूंच्या कल्पनेतील समाजरचना भारतीय घटनेने बहुतांशी स्वीकारली. ब्रिटिश पद्धतीची संसदीय लोकशाही, देशाच्या औद्योगिक प्रगतीसाठी अवजड उद्योगधंदे, वीज आणि पाणी यांसारख्या पायाभूत सुविधा, लोकशाही समाजवाद आणि देशातील दुबळ्या वर्गाच्या कल्याणासाठी विशेष तरतूद या नेहरूंच्या राजकीय तत्त्वज्ञानातील मुख्य बाबी होत्या. गांधीजींना ग्रामप्रधान समाजरचना हवी होती. तिच्यामुळेच माणसामाणसांचे सहकार्य राहील, असे त्यांचे मत होते. साधी राहणी व मानवी श्रमाचे मूल्य कायम राखणारी उत्पादन व्यवस्था त्यांना हवी होती. श्रममूल्याचे आधिक्य (Surplus) भांडवलशाहीत शोषणाचे हत्यार म्हणून उपयोगी पडते व ती एक प्रकारची हिंसा आहे, असे गांधीजी मानत होते. मानवी गरजा वाढवणे म्हणजे प्रगती नव्हे. त्यामुळे त्या मर्यादित ठेवाव्यात, असा त्यांचा आग्रह होता. गांधीजींच्या मनातील समाजरचनेचे हे स्वरूप नेहरूंच्या मनातील चित्रापेक्षा अगदीच निराळे होते. १९२८ पासून अगदी घटनासमितीची निवड होईपर्यंत उभयतांनी आपली भिन्न मते एकमेकांजवळ मोकळेपणाने व्यक्त केली. (या मतभेदांची विस्तृत चर्चा चौथ्या प्रकरणात आली आहे.) नेहरू हेच उद्याच्या स्वतंत्र भारताचे नेतृत्व करणारे आहेत व आपणच त्यांची राजकीय वारस म्हणून निवड केली आहे, हे गांधीजींच्या सतत स्मरणात होते. नेहरूंशी राजकीय संघर्ष करण्याची त्यांची अजिबात इच्छा नव्हती. या परिस्थितीत एकच मार्ग शिल्लक होता, तो म्हणजे घटनेच्या स्वरूपाबद्दलच्या चर्चेतून बाजूला होणे; तोच गांधीजींनी स्वीकारला.

**भावी व्यवस्थेचा विचार**

भारताच्या भावी समाजरचनेबद्दल गांधीजी जी मते वेळोवेळी व्यक्त करीत, ती अप्रत्यक्ष रीत्या त्यांच्या मनातील भारताच्या भावी राज्यघटनेचे स्वरूप सांगणारीही होती. १९०९ साली लिहिलेल्या 'हिंद स्वराज्य' पासून त्याचा प्रारंभ झालेला दिसतो. गांधीजींच्या मतांबद्दल काँग्रेस पक्षाने आणि नेतृत्वाने आदर दाखवला, तरी ती सर्वच त्यांनी कधीही मान्य केलेली नव्हती. खेडी हा मूलभूत आणि स्वायत्त घटक असावा, केवळ ग्रामपंचायतींच्या निवडणुका सरळ मतदानाने व्हाव्यात आणि विधिमंडळासह इतर सर्व निवडणुका अप्रत्यक्ष मतदानाने व्हाव्यात, असे काँग्रेसने कधीच ठरवले नव्हते. खेड्यांची स्वायत्तता हेही तत्त्व काँग्रेसच्या मान्य अधिकृत धोरणात आलेले दिसत नाही. साधी राहणी गांधीजींच्या प्रभावातून अनेक काँग्रेस नेत्यांनी उचलली आणि खादी वापरायला व सूत कातायलाही प्रारंभ केला. गरिबीविरुद्धच्या लढ्याचे, स्वावलंबनाच्या प्रयत्नाचे आणि काही हद्दीपर्यंत स्वातंत्र्याच्या लढ्याचेही चरखा हा प्रतीक झाला; परंतु केवळ चरख्याने किंवा विधायक कार्यक्रमाने सर्व प्रश्न सुटणार नाहीत, हीच काँग्रेसमधील बहुतेकांची मनोधारणा होती. सत्याग्रहाची चळवळ स्थगित झाली किंवा काही कारणाने स्वातंत्र्याच्या चळवळीचा जोर ओसरला, तर गांधीजी विधायक कार्यक्रम सांगत आणि कार्यकर्त्यांना गुंतवून ठेवत. या विधायक कार्यक्रमात अक्षरशः हजारो कार्यकर्त्यांनी भाग घेतला, परंतु स्वतंत्र भारताच्या राजकीय चित्रात चरखा आणि खेड्याची स्वायत्तता यांना गृहीत धरण्यात आले नव्हते. १९३५चा भारत कायदा अस्तित्वात आल्यानंतर ज्या निवडणुका झाल्या, त्यांत काँग्रेस पक्षाने भाग घेतला व काही काळ मंत्रिमंडळेही बनवली होती. १९३५च्या



अनुक्रमणिका

कायद्यात केंद्र आणि राज्यात झालेल्या अधिकार-वाटणीप्रमाणेच खेड्यांनाही स्वतंत्र अधिकार द्यावयास हवे होते, असे मत काँग्रेस पक्षाने त्या वेळी व्यक्त केलेले दिसत नाही. अर्थात हे खरे आहे, की पारतंत्र्यात सार्वभौम सत्तेने केलेला कायदा राबवता येतो किंवा नाकारता येतो; तो बदलून घेणे अवघड असते; शिवाय त्या काळात खुद्द गांधीजींचे घटनेसंबंधीचे विचार पूर्णपणे निश्चित झालेले नव्हते. ते हळूहळू आकार घेत होते. औंध संस्थानासाठी गांधीजींच्या मार्गदर्शनानुसार तयार झालेली राज्यघटना आणि गांधीजींच्या मनाचा कानोसा घेऊन, त्यांच्याशी चर्चा करून श्रीमन्नारायण अग्रवाल यांनी लिहिलेली स्वतंत्र भारतासाठीची गांधीवादी राज्यघटना अशी गरजेप्रमाणे विकसित होत गेलेली गांधीवादी घटनारूपे आपल्याला उपलब्ध आहेत. गांधीजी घटनातज्ज्ञ नव्हते आणि ही गोष्ट त्यांनी स्वतःही मान्य केलेली आहे. फक्त एक तत्त्वज्ञ म्हणून राज्यघटनेचा मूलभूत आशय काय असावा, याबद्दलची आपली मते त्यांनी वेळोवेळी सूत्ररूपाने व्यक्त केलेली आहेत.

**स्वायत्त आणि स्वयंपूर्ण खेडे**

स्वतंत्र भारताच्या राजकीय, आर्थिक आणि सामाजिक रचनेमध्ये गांधीजींच्या मनात खेड्यांना जे स्थान मिळावयास हवे होते, ते बहुपदरी होते. प्रशासनाचा प्राथमिक घटक खेडे हाच असला पाहिजे, त्यांना आपल्या स्वतःचा कारभार करण्याचे पुरेसे अधिकार हवेत; या खेड्यांची पंचायत प्रौढमतदानाने निवडून यावी व या पंचायतीच्या सभासदांनी तालुका पंचायतीसाठी, तालुका पंचायतींच्या सभासदांनी जिल्हा पंचायतीसाठी मतदान करावे, याप्रमाणे क्रमाक्रमाने अप्रत्यक्ष मतदानाने राष्ट्रीय पंचायत निवडून यावी, असे त्यांच्या कल्पनेत होते. स्वतःचे नियम करण्याचा, खेड्यात घडू शकणाऱ्या गुन्ह्याबद्दल व तंट्याबद्दल न्याय देण्याचा आणि नियमांची अंमलबजावणी करण्याचा असा तिन्ही प्रकारचा अधिकार ग्रामपंचायतींना असावा, असा त्यांचा आग्रह होता. गावाचा कर किती व कसा असावा, हे ठरवून तो वसूल करण्याचे काम ग्रामपंचायतीनेच करावे व गावाच्या स्वच्छतेची, आरोग्याची व शिक्षणाची व्यवस्था पाहावी, अशी त्यांची कल्पना होती. गांधीजींच्या कल्पनेतल्या स्वायत्त खेड्यांना स्वतःच्या *विकासाचा आराखडा तयार* करून त्याप्रमाणे नियोजन करण्याचा अधिकार दिला जाणार होता. सध्या नियोजन केंद्रीभूत आहे; गांधीजींना ते विकेंद्रित हवे होते. आपल्या खेड्याचे प्रश्न त्या खेड्यात राहणाऱ्यांनाच अधिक चांगले कळतात, असे गांधीजींचे मत होते.

प्रत्येक खेडे हे आर्थिक दृष्ट्या स्वयंपूर्ण असावे, असे गांधीजींना वाटत होते. त्या खेड्यातील लोकांच्या दैनंदिन वस्तूंच्या गरजा त्या खेड्यात निर्माण झालेल्या उत्पादनांनीच भागवाव्यात, अशी त्यांची कल्पना होती. खेडे स्वयंपूर्ण असले तरच ते स्वायत्त होऊ शकेल; ते जर दुसऱ्यावर अवलंबून असले, तर दुसऱ्याचा प्रभाव त्यावर पडेल, असा त्यांचा हिशेब होता. स्वयंपूर्ण खेड्याबद्दलचा गांधीजींचा आग्रह आणखी एका गृहितामुळे होता. माणसे एकमेकांवर अवलंबून असली म्हणजे त्यांच्यात सामंजस्य टिकते, ती परस्परांना धरून राहतात असे ते गृहीत होते. गावचा तेली, विणकर, लोहार आणि सुतार यांची इतर सर्वांनाच गरज पडते. तेव्हा या सगळ्यांना हा व्यवसाय नसलेले लोक व्यवस्थित वागवतील व त्यांच्या गरजाही भागवतील, असे ते गृहीत होते.

खेड्याच्या स्वयंपूर्णतेची त्यांची कल्पना फार काटेकोर व कोणत्याही अपवादाची परवानगी न देणारी होती, असे समजण्याचे कारण नाही. जेव्हा सर्वसामान्यपणे त्या खेड्यातल्याच अगर आजूबाजूच्या खेड्यांतील उत्पादनाने लोकांच्या गरजा भागत होत्या, त्या काळातही काही वस्तू बाहेरून आणाव्याच लागत होत्या. उदा., देशावरच्या लोकांसाठी कोकणातून मीठ आणि नारळ आयात होतच असत. अशी आणखीही काही उदाहरणे सांगता येतील.

गांधीजींची ग्रामस्वराज्याची कल्पना स्वयंपूर्णतेबरोबर, स्वावलंबनाबरोबर राजकीय स्वायत्ततेचीही मागणी करणारी होती. २६ जुलै १९४२ रोजी 'हरिजन' साप्ताहिकात प्रसिद्ध झालेल्या लेखात त्यांनी 'ग्रामस्वराज्याची माझी कल्पना पूर्ण प्रजासत्ताकाची आहे, आपल्या गरजांसाठी शेजाऱ्यांवर अवलंबून नसलेली ती (खेडी) असावीत....... गावातले सरकार दरवर्षी निवडून येणाऱ्या पाच सभासदांच्या पंचायतीने चालवावे. त्यांनाच कायदे करण्याचे, न्याय देण्याचे व कार्यपालिकेचे अधिकार असावेत. अशा

ग्रामराज्यात प्रत्येक व्यक्ती पूर्ण स्वतंत्र असेल व तेथेच खरी लोकशाही नांदू शकेल.'

**खेडी स्वयंपूर्ण का होती?**

गांधीजींच्या स्वप्नातले हे खेडे भारतीय समाजरचनेत कधीकाळी अस्तित्वात होते, असे अनेक भारतीयांना वाटते. देशाच्या राजकीय केंद्रात होणाऱ्या घडामोडींपासून दूर असलेली ही खेडी आपल्यापुरती स्वतंत्र व्यवस्था करून घेऊन अस्तित्व टिकवून होती. गांधीजींच्या कल्पनेत प्रत्येक खेड्याने आपल्या गरजा शक्यतो स्वतःच भागवाव्यात व दुसऱ्यावर अवलंबून राहू नये म्हणजे त्यांची स्वायत्तता टिकेल, असे होते. ही स्वायत्तता ज्या काळात खरोखरच अस्तित्वात होती, ती काही भौगोलिक कारणामुळे आणि भौतिक साधनांच्या अभावामुळे. स्वायत्ततेचे दुसरे रूप म्हणजे Isolation. १९ व्या शतकाच्या प्रारंभापर्यंत पश्चिम भारतात बैलगाडीचे रस्तेही अस्तित्वात नव्हते आणि सह्याद्रीचे डोंगर ओलांडून महाराष्ट्रात येणाऱ्या वस्तू माणसाच्या डोक्यावर ओझे म्हणूनच आणाव्या लागत. बैलगाडीची चाके आताच्या-सारखी आरे असलेली नव्हती. ती पूर्ण भरीव लाकडाची होती; त्यामुळे बैलगाडीने दळणवळणसुद्धा कठीण होते. नंतर आऱ्याची चाके तयार झाली. उंट आणि गाढवावर होणारी वाहतूक हळूहळू बैलगाड्यांनी होऊ लागली. हे सर्व होईपर्यंत दोन खेड्यांत दळणवळण फारच अवघड होते. [१] या काळात एका खेड्यात तयार होणारा माल शक्यतर त्याच खेड्यात, जास्तीत जास्त शेजारच्या एक-दोन खेड्यांत उपलब्ध होऊ शके. गावच्या तेल्याने उत्पादित केलेले तेलच वापरायचे आणि गावच्या विणकराने विणलेले वस्त्रच ल्यायचे. हे सर्व एखाद्या नैतिक कल्पनेमुळे घडत नव्हते, तर ती एक विवशता होती. एक सोय अशी होती, की उत्पादक आणि उपभोक्ता यांच्या दृढ परिचयामुळे वस्तुविनिमयाद्वारेही खरेदी-विक्री होऊ शके.

दळणवळण सोपे नसणे हे पहिले कारण तर दुसरे कारण म्हणजे एकच गरज भागवणाऱ्या वेगवेगळ्या प्रकारच्या व दर्जाच्या वस्तूंमधून निवड करण्याची संधी नव्हती. गावात विणलेले कापड व दुसऱ्या गावातल्या विणकराचे कापड, आपल्या गावातील तेल्याचे गोडेतेल आणि दुसऱ्या गावातील गोडेतेल यांत फारसा फरक नव्हता. आज प्रचंड संख्येने वेगवेगळे पर्याय ग्राहकाला उपलब्ध होत आहेत. पूर्वी तसे नव्हते. आज चांगल्या राहणीच्या खऱ्या-खोट्या कल्पनांनी गरजांत झालेली बेसुमार वाढ त्या वेळी झालेली नव्हती.

दळणवळण फार कमी आणि तेही खर्चिक होते. तेव्हा श्रीमंतांना आणि राजेमहाराजांना लागणाऱ्या वस्तूच फक्त गावातून राजधानीच्या किंवा दुसऱ्या मोठ्या गावाकडे जावयाच्या. राजकीय परिस्थिती अस्थिर असेल, तर या चैनीच्या किंवा कलाकुसरीच्या वस्तूंचे दळणवळणही थांबायचे. खेडी इतकी स्वायत्त असायची, की त्यांना राजधानीत काय चालले आहे याचा पत्ताच नसावयाचा; असे अनेक आर्थिक इतिहासकारांनी नमूद केले आहे. फक्त आपल्यावर धाड येऊ नये व आपली लुटालूट होऊ नये, एवढ्याचीच ते चिंता करीत. मध्ययुगीन काळातले राज्यकर्ते हे सरंजामदारी पद्धतीचे राज्यकर्ते होते. प्रजेच्या ऐहिक सुखाकडे लक्ष देणारा राजा एखादा अपवाद. इतरांचे लक्ष महसूल गोळा करणे, दुसऱ्याच्या अधिकार-क्षेत्रात असलेल्या मुलखात लुटालूट करणे आणि आपण आणि आपले सरंजामी साथीदार यांच्या सुखासीन जीवनाची तरतूद करणे एवढ्याकडेच होते. एखाद्या शेरशहा सुरीने रस्ते बांधले, रस्त्याच्या कडेला झाडे लावली, तर त्याचे इतिहासाला कौतुक करावे वाटे. एखाद्या शहरात राज्याच्या अधिकाऱ्यांसाठी पाणीपुरवठ्या-सारख्या सोयी होत. इतर खेडी शांतपणे आपापल्या ठिकाणी जगू दिली जात. त्यामुळे त्यांची स्वायत्तता टिकून राही. ही स्वायत्तता एक प्रकारची अपरिहार्यता होती व राज्यसत्तेचा स्वार्थ नसल्यामुळे खेड्याच्या व्यवस्थापनात हस्तक्षेप करण्याचे त्यांनाही कारण नसे.

**मेटकाफचे मत आणि त्याचा प्रतिवाद**

सर चार्ल्स मेटकाफ यांनी आपल्या १८३० च्या मिनिटमध्ये भारतातील खेड्यांसंबंधी आपले निरीक्षण नोंदवले ते सर्वश्रुत आहे. "भारतीयांचे (त्यांच्या सामाजिक जीवनाचे) रक्षण करणारी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे प्रत्येक खेड्याचे जवळजवळ स्वतंत्र असलेले राज्य. अनेक क्रांत्या आणि बदल होऊनही खेड्यांमध्ये अंतर्गत स्वातंत्र्य बऱ्याच अंशी शिल्लक राहिले आणि त्यांचे सौख्यही कायम राहिले. माझी अशी इच्छा आहे, की हे








जे खेड्यांचे स्वरूप आहे ते बदलले जाऊ नये."

चार्ल्स मेटकाफ यांचे भारतीय खेड्यांची स्वायत्तता व स्वयंपूर्णता यांबद्दलचे हे मत विचारात घेताना एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. मेटकाफ हे भारतात राज्यकारभार करणाऱ्या ईस्ट इंडिया कंपनीच्या प्रशासनातील अधिकारी होते. त्यांचा संबंध जमीनमहसुलाशी अधिक होता. ब्रिटिशपूर्वकाळात प्रत्येक शेतकऱ्याचा सरकारशी जमीनमहसुलाबाबत स्वतंत्र ठराव नसे. सर्व गावाचा महसूल एकत्रच गाव सरकारला देई. त्यामुळे सरकारलाही वसुली सोपी होत असणार. दुसरे म्हणजे खेड्यांच्या स्वायत्त कारभामुळे तेथील प्रशासनात फारसे लक्ष घालण्याचे काम सरकारला पडत नव्हते. तरीही मेटकाफच्या अभिप्रायातील स्वायत्ततेबद्दलचा चांगला भाग विचारात घेतलाच पाहिजे.

मेटकाफच्या या अभिप्रायावर डॉ. आंबेडकरांनी आणि इतरांनीही खूप कडक टीका केली आहे. घटनासमितीतील ४ नोव्हेंबर १९४८ च्या भाषणात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी 'अज्ञान, संकुचित मनोवृत्ती आणि जातीयवाद यांचा अड्डा' असे खेड्यांचे वर्णन केले होते.[२] कार्ल मार्क्सनी 'भारतीय ग्रामव्यवस्था ही पराकोटीची प्रतिगामी असून मानवजातीला प्रगती करावयाची असेल, तर ती नष्ट करणे अगत्याचे आहे', असे म्हटले आहे. 'भारतीय खेड्यातील जीवन हे असंस्कृत, जंगली आहे', असे त्यांचे मत होते. 'हे ग्रामीण समुदाय साधे व निरुपद्रवी भासत असले, तरी ते जुलमी राज्यव्यवस्थेचे आधार आहेत, हे आपण विसरता कामा नये. त्यांनी मानवी मनाचा विकास होऊ दिला नाही, त्याला एका छोट्या परिघात बंदिस्त करून ठेवले व अंधश्रद्धा आणि रूढी यांच्या प्रभावात कायमचे जखडून ठेवले.' असे मार्क्सनी म्हटले आहे. [३] मेटकाफने खेड्याच्या इतरांपासूनच्या तुटक असण्याचा एकच परिणाम लक्षात घेतला होता. बाहेरच्या जगाशी संबंधच न उरल्यामुळे खेडी नव्या ज्ञानापासून, जगातल्या बदलापासून तसेच नव्या विचारपद्धतीपासून वेगळी पडली. शिवाय प्रत्येक खेड्यात जे बलवान होते, त्यांना इतरांची पिळवणूक करण्याची संधी मिळाली. खेड्यांतील समाजबांधणी इतकी मजबूत होती, की या पिळवणुकीविरुद्ध दाद मागणेही अवघड झाले होते, असेही काहींचे निदान होते.

आज खेड्यातील परिस्थिती पूर्ण बदललेली आहे. दळणवळण सोपे झाले. जवळच्या मोठ्या गावात अगर शहरात वस्तूंचे अनेक पर्याय उपलब्ध झाले. माणसांच्या गरजा कृत्रिम रीतीने वाढवण्याचे प्रयत्न (उदा., जाहिराती, प्रतिष्ठेची नवी मापके, वस्तूंच्या गुणवत्तेत होणाऱ्या सुधारणा) जोरात चालू आहेत. माणसांच्या गरजा वाढवण्याचे हे प्रयत्न केवळ बाजारविषयक किंवा आर्थिक कार्यक्रम राहिलेला नाही. तो आपल्या सामाजिक आणि राजकीय व्यवस्थेवरसुद्धा परिणाम करू लागला आहे. साध्या राहणीचा उपदेश गांधीजींनी प्रत्यक्ष आपल्या उदाहरणाने जेव्हा केला, त्या काळात तो पाळणे आजच्यापेक्षा सोपे होते. मोह उपलब्ध नव्हते किंवा त्यांची संख्या कमी होती. आज तसे नाही. उपभोगाची आसक्ती ही मनुष्याची स्वाभाविक प्रेरणा आज आमच्या अर्थव्यवहाराचा आधार बनली आहे. महात्मा गांधींच्या काळात साध्या राहणीचे किंवा खादीच्या वापराचे नाते स्वातंत्र्य व समतेच्या लढ्याशी जोडले होते. त्यामुळे या दोन्हींना एक प्रकारचे नैतिक अधिष्ठान मिळाले होते. आज तसे काही ध्येय चळवळीच्या स्वरूपात साध्या राहणीशी पूर्वीइतक्या ठसठशीतपणे जोडले गेलेले दिसत नाही. असे नैतिक अधिष्ठान स्वदेशीच्या किंवा स्वग्रामीच्या आग्रहाला काही अपवादात्मक काळातच जोडलेले राहू शकते; सर्व काळात नाही.

दळणवळणाची साधने जेव्हा वाढली तेव्हा ही स्वयंपूर्णता, आनुषंगिक स्वायत्तता आणि पर्यायाने आलेले Isolation हे सर्व हळूहळू नष्ट झाले. गांधीजींच्या हयातीत ही प्रक्रिया सुरू झालीच होती. आता ती काही दुर्गम आदिवासी विभाग वगळता जवळपास पूर्ण झाली आहे. आज कोणताही देशसुद्धा पूर्णपणे स्वावलंबी, आर्थिक दृष्ट्या स्वायत्त आणि इतरांपासून तुटलेला राहू शकत नाही; खेड्यांबद्दल तर हे घडणारच नाही. बाहेर तयार झालेल्या अधिक चांगल्या आणि स्वस्त वस्तू उपलब्ध असताना आपल्याच देशात किंवा गावात तयार झालेल्या वस्तूच वापरावयाच्या असा निश्चय करणाऱ्या व्रतधाऱ्यांची संख्या त्याही काळात कमी होती; आजतर ती नगण्य आहे.








**वाढलेल्या आणि वाढवलेल्या गरजा**

सर्वसाधारण नागरिकाचे, त्यात खेड्यातले नागरिकसुद्धा आले, राहणीमान आज खूपच बदलले आहे. अनेक नव्या वस्तू त्याच्या मूलभूत गरजेच्या यादीत समाविष्ट झाल्या आहेत आणि अशा वस्तूंना (उदाहरणार्थ, लिहिण्यासाठीचे पेन किंवा स्वच्छतेसाठीचा साबण) यांना चैनीच्या वस्तू समजण्याचे काहीच कारण नाही. आर्थिक उत्पन्न जेव्हा वाढते, तेव्हा राहणीमान आपोआप वाढते आणि त्यासाठी अधिक चांगल्या, अधिक उपयोगी वस्तू घेण्याची गरज वाटू लागते. हा सर्व खर्च उधळपट्टी आहे, असे मानण्याचे कारण नाही. स्वयंपाकाचा गॅस, स्टेनलेस स्टीलची भांडी अशा काही उदाहरणांचा विचार करता येईल. या सर्व गोष्टी खेड्याने नाकाराव्या, असे म्हणणे सयुक्तिक ठरणार नाही. अशा सर्व वस्तू खेड्यात तयार होणे व त्या किफायतशीर भावाने विकता येणे अशक्य आहे. जेव्हा बाजारात अधिक चांगल्या व परवडणाऱ्या वस्तू उपलब्ध होतात व घरापासून बाजारापर्यंतचे दळणवळण सोपे होते, तेव्हा ग्राहक त्या वस्तूकडे वळणार हे स्वाभाविक आहे.

सतीश कुमार यांच्यासारखे गांधीविचाराचे समर्थक आजच्या काळातही खेडे स्वयंपूर्ण राहू शकेल, असे मानतात. प्रत्येक खेड्याला स्वतःचा सुतार, चांभार, गवंडी, विणकर, शिक्षक, तंत्रज्ञ, सावकार, व्यापारी, कलावंत आणि धर्मगुरू हवा, असे त्यांना वाटते. 'स्वदेशी'ची अशी कल्पना त्यांना आजही व्यवहार्य वाटते. खेडी नुसती स्वयंपूर्ण नव्हे तर स्वायत्तही असावीत व अशा ग्रामप्रजासत्ताकांचे मिळून भारत हे संघराज्य असावे, असे गांधीजींचे मत होते व ते त्यांनाही (सतीश कुमार यांना) मान्य आहे, असे त्यांनी लिहिले आहे. [४] गांधीविचारांचा आधुनिक तंत्रविज्ञानाचा परिप्रेक्षात अभ्यास करणारे एक विचारवंत सुधींद्र कुलकर्णी यांना मात्र सतीश कुमारांनी रंगवलेली ग्रामप्रजासत्ताके प्रत्यक्षात येण्याचा आता सुतराम संभव नाही, असे वाटते. ग्रामीण समाज हा शहरी समाजापासून अलग राहिलेला नाही. त्यामुळे खेडे स्वयंपूर्ण होऊ शकणार नाही, असे कुलकर्णी यांना वाटते. जर आम्ही आज अस्तित्वात असलेल्या वास्तवाच्या संदर्भात 'स्वदेशी' या संकल्पनेचा पुनर्विचार केला नाही, तर गांधीजींची ही कल्पना केवळ ऐतिहासिक अवशेष म्हणूनच शिल्लक राहील, असे त्यांना वाटते. [५] आज नागरीकरण झपाट्याने होत आहे व तो बदल अपरिहार्य मानला गेला आहे. देशाच्या एकूण लोकसंख्येपैकी शहरात राहणारांची संख्या १९७१ साली २०.२२ टक्के होती; ती २००१ साली २७.७८ टक्के झाली. तामीळनाडू, महाराष्ट्र, गुजरात अशा काही राज्यांत तर नागरीकरण अधिक वेगाने होत आहे. या राज्यात अनुक्रमे ४३.८६, ४२.४० व ३७.३५ टक्के लोक शहरात राहतात. [६]

राहणीमान वाढण्याच्या या प्रक्रियेत एक-दोन अडचणींच्या आणि समान विकासतत्त्वाशी विसंगत गोष्टी आहेत. खेड्यातील सर्वच समाजघटकांचे राहणीमान समान पद्धतीने वाढलेले नाही. जे राजकीय दृष्ट्या कमकुवत आहेत, अशा अनेक समाजघटकांपर्यंत विकासयोजनांचा लाभ पोचत नाही. शहरातील नव्या वस्तू विकत घेण्याची क्रयशक्ती त्यांच्या जवळ नाही आणि दुसरीकडे खेड्यात मिळणाऱ्या वस्तू आणि ते तयार करणारे बलुतेदार कारागीर आता अदृश्य होऊ लागले आहेत. दुसरीही एक गोष्ट होते आहे. अस्तित्वात आलेल्या बाजार अर्थशास्त्राने काही वस्तू खपाव्यात म्हणून जाहिरातींच्या साहाय्याने नव्या गरजा निर्माण करायला प्रारंभ केला आहे. या अनावश्यक परंतु गरजेच्या भासणाऱ्या वस्तूंनी दुकाने भरून गेली आहेत. मोबाईल फोन आवश्यक आहे हे खरे; पण तो शौचालयापेक्षा अधिक गरजेचा नाही. (भारतातील एका पाहणीत शौचालयापेक्षा ग्रामीण भागात मोबाईल फोनच जास्त असल्याचे दिसून आले आहे.) हे कृत्रिम रीतीने वाढविलेले राहणीमान हा समाजापुढचा आदर्श बनू पाहत आहे. हे थांबवता येणे अवघडच नव्हे, तर अशक्य आहे. अशा वेळी खऱ्या गरजेच्या वस्तू (उदा., अन्नधान्य, साखर, गोडेतेल, सर्वसाधारण कापड) लोकांना उपलब्ध करून देण्याची आवश्यकता कायमच आहे. देशातील सार्वजनिक वितरणव्यवस्था आणि सहकारी भांडारे यांच्यापुढचे ते आव्हान शिल्लकच आहे.

**गांधीजी : परिवर्तनवादी तत्त्वज्ञ व नेते**

धर्म आणि परंपरा यांच्या आधाराने उभ्या असलेल्या

भारतातील समाजरचनेचा गांधीजी उपयोग करून घेऊ इच्छीत होते. याचा अर्थ ते परंपरावादी होते किंवा जुन्याला कवटाळून बसणारे होते, असा मात्र अजिबात नाही. धर्म, सामाजिक प्रथा आणि राजकारण या तिन्हींमध्ये गांधीजींनी परिवर्तनाचा जो प्रयत्न केला, तो केवळ अपूर्व होता. गांधीजी स्वतःला धार्मिक म्हणवत; परंतु धर्माचा समाजमनावर पगडा बसवणाऱ्या ज्या प्रथा होत्या, त्यांपैकी निदान काही मोडीत काढण्याचा गांधीजींनी प्रयत्न केला. अस्पृश्यता ही खोलवर रुजलेली अशीच एक प्रथा होती. त्याविरोधात लोकमानस तयार करणे अवघड होते. ते गांधीजींनी करण्याचा प्रयत्न केला. अस्पृश्यता ही हिंदू धर्माच्या मूलभूत तत्त्वज्ञानाचा भाग नाही, हे सिद्ध करण्यासाठी हिंदू शास्त्र्यांची त्यांनी मदत घेतली. समाजाची मनोधारणा जर धर्माला प्राधान्य देणारी आहे, तर अस्पृश्यतेसारख्या रूढी धर्मालाही अमान्य होत्या, असे दाखवणे त्यांना अगत्याचे वाटले. स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीचे आणि सन्मानाचे स्थान मिळवून देण्यासाठी त्यांनी प्रयत्न केले. 'जाहीर सभेत निदान पाच महिला उपस्थित नसतील, तर मी भाषण करणार नाही', असा नियम त्यांनी एकदा केला होता. महिला राजकीय सभांना येऊ लागल्या; एवढेच नव्हे, तर त्यांनी सत्याग्रहसुद्धा केले, त्या तुरुंगात गेल्या आणि राजकीय जीवनाच्या एक भाग बनल्या, याचे पुष्कळसे श्रेय गांधीजींचे आहे. स्त्री ही पुरुषांच्या बरोबरीची नाही, ही समाजमनाची धारणा मोडून काढण्याच्या प्रयत्नात गांधीजींचे योगदान महत्त्वाचे आहे. आपल्या मागण्यांसाठी अहिंसक पद्धतीने लढता येते, हे गांधीजींनी दक्षिणा आफ्रिका आणि भारत या दोन्ही ठिकाणी सिद्ध केले. भारतीय स्वातंत्र्याचा लढा अहिंसक राहूनही तीव्र बनू शकला, याचे श्रेय गांधीजींचेच आहे. गांधीजी धर्म किंवा समाजरचना पूर्णपणे मोडीत काढून न टाकता तिचा काय उपयोग करता येईल, तिच्यात काय बदल करता येईल, याचा विचार करीत. भारतीय राजकारणाला गांधीजींनी नीतिमूल्यांची जोड दिली, असे म्हटले जाते. धर्म, समाजरचना आणि राजकारण याचबरोबर माणसाचे व्यक्तिजीवन हिंसेपासून म्हणजे दुसऱ्यावर अन्याय करण्यापासून मुक्त असावे, असा त्यांचा प्रयत्न होता. ग्रामप्रधान समाजरचना हे त्यांच्या तत्त्वज्ञानाचेच एक व्यावहारिक रूप होते.

**स्वप्न आणि वास्तव**

गांधीजींच्या कल्पनेतील खेडे वास्तवात तसे नाही व ते गांधीजींच्या कल्पनेप्रमाणे होण्याची शक्यतासुद्धा फारशी नाही, असे अनेकांचे मत होते. सामंजस्य आणि परस्परसहकार्य यांवर आधारलेले खेडे हे आता फक्त स्वप्न म्हणूनच पाहता येईल, असे त्यांना वाटत होते. परस्परसहकार्याचे वातावरण खेड्यात शिल्लक राहण्याऐवजी त्यात सामाजिक आणि आर्थिक पिळवणूक सुरू झाली. जो वर्ग सुस्थितीत होता, त्याचीच सत्ता चालू लागली आणि खेडी ही बाहेरच्या जगापासून अलिप्त असल्यामुळे या दंडेलीला कोणी विचारणारा उरला नाही. स्वायत्ततेचे रूपांतर इतरांपासूनच्या अलिप्ततेत झाले आणि ही अलिप्तता शोषणाला उपयोगी पडली. अगदी खेड्याच्या स्वयंपूर्णतेसाठी आवश्यक असलेल्या छोट्या कारागिरांचे, श्रमिकांचे म्हणजे बलुतेदारांचे उदाहरण घेतले, तरी हा बदल स्पष्ट होईल. बलुत्याची कल्पना परस्परसहकार्याच्या आणि गावाची गरज पुरवण्याच्या कल्पनेतून निर्माण झाली. नंतरनंतरच्या म्हणजे अलीकडच्या काळात बलुतेदारांना पूर्वीच्या सन्मानाने वागवणे जमीनमालकांनी बंद केले आणि आपल्या श्रमाच्या हक्काबद्दल मिळणारा वार्षिक मोबदला हा जणू काही भीक आहे, अशा रीतीने स्वीकारणे बलुतेदारांना भाग पडले. गावकीची कामे करणाऱ्या दलित समाजाची अवस्था तर आणखीही वाईट करून टाकण्यात आली होती. त्यांच्या श्रमाचा मोबदला सन्मानाने देणे तर बाजूलाच; पण त्यांची अवहेलना होऊ लागली. आज तर सुतार, लोहार, चांभार, न्हावी असे खेड्यातले बलुतेदार आता गावात राहिलेच नाहीत. ते शहरांत किंवा मोठ्या गावांत स्थलांतरित झाले आहेत. या कारागिरांची सेवा आता रोखीनेच मिळते. बलुते बंद झाले आहे. हे जे खेड्यांचे रूप आपली राज्यघटना तयार होतानाच्या काळात झाले होते, त्याची यथायोग्य जाणीव जवाहरलाल नेहरू आणि डॉ. आंबेडकरांना होती. नेहरूंनी गांधीजींना लिहिलेल्या एका पत्रात खेड्यांबद्दलचे आपले मत स्पष्टपणे नमूद केले होते. त्याचा आणि डॉ. आंबेडकरांच्या मताचा उल्लेख मागे आला आहे. समाजवादी नेते आणि विचारवंत अशोक

मेहता यांनीही 'Village communities have generally broken down; the villages present a picture of economic debris and social decay.'[७] असा परखड अभिप्राय व्यक्त केला होता.

भारतीय खेड्यांचे गुणदोष, दोन्हीही जयप्रकाश नारायणांनी लक्षात घेतले आहेत. सर्व देशाच्या कल्याणाची एखादी गोष्ट सामान्य माणसाला सांगितली, तर ती त्याला स्पष्ट होत नाही. ३७ कोटी (तेव्हाची लोकसंख्या) भारतीयांचे हित त्याच्या सहज लक्षात येत नाही; परंतु त्याच्या गावाच्या हिताचे काही त्याला सांगितले,तर त्याला लवकर कळते, असे त्यांचे व्यावहारिक निरीक्षण आहे. कधीकाळी अस्तित्वात असलेल्या ग्रामस्तरावरच्या गणराज्याशी थोडेफार नाते सांगू शकणारे एकही खेडे ब्रिटिशांनी १९४७ साली भारत सोडला, त्या वेळी अस्तित्वात नसावे, असे जयप्रकाशांचेही मत आहे. ज्या परंपरा आम्ही वारशात मिळवल्या, त्या बहुतेक लोकशाहीविरोधीच होत्या व आज स्थानिक स्वराज्याच्या किंवा सहकारी तत्त्वाच्या ज्या योजना खेड्यात रुजवण्याचा प्रयत्न केला जात आहे, त्या भूतकाळाशी नाते सांगणाऱ्या नाहीत, त्यांचा उद्देश खेड्यातील लोकांना तर्कशुद्ध विचार करायला लावणे व बदल आणि विकास यांची प्रेरणा देणे हा आहे, असे जयप्रकाशांना वाटते.[८]

स्वायत्त खेड्यांची कल्पना ज्यांनी अजूनही एखाद्या धर्मतत्त्वाप्रमाणे प्रत्यक्ष आचरणात जपून ठेवली आहे, असा एक लोकसमुदाय दक्षिण फ्रान्समध्ये अजूनही अस्तित्वात आहे. १९३७ मध्ये गांधीजींची भेट झालेल्या जोसेफ जीन लांझा देल वास्तो ( १९०१-१९८१) यांनी शांतीदास हे गांधीजींनी दिलेले नाव धारण करून या प्रयोगाला सुरुवात केली. १९५४ मध्ये भूदान चळवळीच्या काळात ते विनोबा भाव्यांना भेटावयास आले होते. आर्क या नावाने ओळखला जाणारा हा समुदाय लॅग्यूडॉक टेकड्यांच्या जवळ सुमारे एक हजार एकर जागेत राहतो. सत्तेत प्रेम आणि परस्परसहिष्णुता या तत्त्वावर आधारलेले सामुदायिक जीवन या समुदायाची पन्नास माणसे जगतात. आपल्या स्वतःच्या गरजा पूर्णपणे स्वतःच भागवतात व बाहेरची कोणतीही वस्तू किंवा मदत घेत नाहीत. साध्या राहणीतून स्वायत्तता आणि स्वातंत्र्य मिळवण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. त्यांच्या या वसाहतीला दरवर्षी तीन हजारांहून अधिक लोक भेट देतात.[९]

या वसाहतीतील प्रयोग एखाद्या प्रदर्शनीय अवशेषा-प्रमाणे राखून ठेवला जाणार की जगभरचे लोक यापासून स्फूर्ती घेणार, हा प्रश्न होता. अजूनतरी आर्क वसाहती-प्रमाणे संपूर्ण स्वायत्त वसाहती इतरत्र स्थापन झाल्याचे दिसत नाहीत. मात्र जगाच्या आचारप्रवाहाविरुद्ध आपल्या निष्ठेला जपत हा प्रयोग करणाऱ्या लोकांचे कौतुकच केले पाहिजे.

**सहकारी संस्थांचा अनुभव**

नियोजनासाठी खेडे हा घटक समजणे व्यवहार्य नाही, असे मत प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ व नंतर नियोजन मंडळाचे काही काळ उपाध्यक्ष असलेले डॉ. धनंजयराव गाडगीळ यांनीसुद्धा व्यक्त केलेले दिसते. अगदी प्राथमिक व छोट्या एककाच्या नियोजनातसुद्धा विविध अंगांचा विचार करावा लागतो. अशा विचारात पुरवठा आणि विक्री या घटकांचाही समावेश होतो. तेव्हा निदान एका शेतमाल बाजारसमितीच्या कक्षेत येणारे क्षेत्रतरी नियोजनासाठी प्राथमिक एकक म्हणून मानावे लागेल, अशी गाडगिळांची सूचना होती.[१०] नियोजनासाठी खेडे हा स्वतंत्र घटक मानता येईल की नाही, हा वादाचा मुद्दा आहे; परंतु नियोजन हे खालून म्हणजे तळापासून वर गेले पाहिजे, हे सर्वसामान्यतः मान्य झालेले आहे. जर ग्रामीण भागात राहणाऱ्या नागरिकांचा सहभाग नसेल, तर वरून पाठवलेल्या अगर लादलेल्या योजना फारशा यशस्वी होत नाहीत.

भारताच्या ग्रामीण पुनर्रचनेत सहकारी संस्थांना उपयुक्त भूमिका करता येईल, याबद्दल महात्मा गांधी आणि पंडित जवाहरलाल नेहरू यांचे एकमत दिसते. प्रा. श्रीमन्नारायण अग्रवालांनी गांधीविचारातील राज्यघटनेचा जो आराखडा दिला आहे, त्यात प्रत्येक खेड्यात सहकारी तत्त्वावर ग्रामोद्योग, डेअरी, शेतमाल व ग्रामोद्योगांच्या वस्तूंची खरेदी-विक्री, धान्य साठवणुकीसाठी गोदामांची व्यवस्था केली जाईल, असे म्हटले आहे. "छोट्या खेड्यांत जेथे लोक एकमेकांना दीर्घकाळ परिचित असतात व कौटुंबिक संबंधासारखी जवळिकीची भावना असते, तेथे सहकारी संस्था यशस्वी होतील. अशा वातावरणात








सहकार्याने काम करणे सोपे असेल", असे नेहरूंनी म्हटले आहे.[१२] सहकारी चळवळीच्या यशस्वितेसाठी भारतीय खेड्यांत इतिहासकालापासून असलेले परंपरागत सामंजस्य आणि समुदायभावना उपयोगी पडेल, असे सर्वांचेच, अगदी नियोजनमंडळाचेही मत दिसते; पण हे सामंजस्य पंचायतींना स्वायत्त करून, त्यांना राजकीय आधार देऊन मूलभूत घटनात्मक एकक म्हणून काम करण्यास उपयोगी पडेल, असे मात्र गांधीजी वगळता कोणालाच वाटत नव्हते. एकमेकांवर कुरघोडी करण्याची इच्छा, सत्तापदाची अभिलाषा, जातीयवाद आदी दुर्गुण जर खेड्यात असतील, तर सहकारी अर्थकारणातही (त्यात राजकारण असतेच) आडवे येणारच. आज सहकारी चळवळीची जी दशा झाली आहे, ती याचीच निदर्शक आहे. सरकारी पुढाकाराने सहकारी चळवळ संख्यात्मक दृष्टीने वाढली, पण तिच्यातला सहकाराचा प्राणच हरवला. कारण त्यांत सहकार्याची भावना नव्हती, सरकारकडून मिळणाऱ्या अर्थसाहाय्याचा लाभ घेणे हाच एकमेव उद्देश उरला व त्यातही मग पदांचा गैरवापर करून तो लाभ आपल्याच पदरात पाडून घेण्याचा उद्योग सुरू झाला.

**खेड्यांचे अस्तित्वच धोक्यात**

गांधीजींच्या कल्पनेतील स्वयंपूर्ण खेडी आज अशक्य झाली असली, तरी भारतात खेडी कायम राहावयाची की नाहीत आणि देशातल्या लोकसंख्येच्या एका मोठ्या भागाने त्यांत राहावयाचे की नाही, हा नियोजन-कारांसमोरचा महत्त्वाचा प्रश्न आहे. बाजारव्यवस्थेने अशा सगळ्याच प्रश्नांचा निर्णय करावयाचा म्हटले, तर समाजव्यवस्था कोसळू द्यावयाची व त्यात निर्माण होणाऱ्या गंभीर मानवी प्रश्नाकडे दुर्लक्ष करावयाचे, हाच एका दृष्टीने क्रूर असणारा मार्ग उपलब्ध असेल. आज प्रत्येक खेड्यातील अनेक घरे ओस पडली आहेत. शेतजमीन कसणाऱ्यांच्या मालकीची व्हावी, यासाठी कूळकायदे आले. नियोजन मंडळानेच करविलेल्या पाहणीनुसार सामर्थ्यवान कुळांना कूळकायद्याचा फायदा मिळाला आणि दुबळ्या जमीनमालकांना फटका बसला; मात्र जे जमीनमालक जबरदस्त होते, त्यांना कूळ-कायद्यातून विविध मार्गांनी वाचता आले आणि त्यांची कुळे लाभाविनाच राहिली. आज पैशाने सर्व गोष्टींवर मात झाली आणि बहुतेक सगळी जमीन विक्रीसाठी उपलब्ध होऊ लागली आहे. कल्पनेत कधी येणार नाही एवढी किंमत जमिनीला मिळते म्हटल्याबरोबर कसणारा शेतकरी आपली जमीन दुसऱ्याला बहुधा बिगरशेती उपयोगासाठी देऊन तात्पुरती श्रीमंती आणि कायमची कंगाली विकत घेऊन खेड्याबरोबर जातो आहे. लोकांच्या पैशाने, त्यांनी दिलेल्या करातून जी धरणे बांधली, त्यांतील पाण्याने जी भिजू लागली, ती पाणभरती जमीन बिगरशेती कामासाठी वापरू देण्याचे प्रमाण प्रचंड वाढले आहे. हे राष्ट्रीय दृष्ट्या पाप आहेच; पण ते कायदेशीर रीत्याही गुन्हा ठरवले पाहिजे. जर देशात साधनसामग्रीची कमतरता असेल, तर पाणभरती जमिनीचा हा उपयोग कशाकरता? औद्योगिकीकरणाला विरोध करण्याचे काहीच कारण नाही. कारखाने जरूर उभे राहावेत पण ते शक्यतो पडीक किंवा कमी उत्पन्न देणाऱ्या जमिनीवर. तेथून शहरापर्यंतचे रस्ते हा उद्योगधंद्यातील खर्चाचा एक भाग समजला गेला पाहिजे.

राहणीमान जेव्हा वाढले, अगदी खेड्यांतील लोकांचीही क्रयशक्ती वाढली, त्या वेळी खेडी कायम राहून तेथे आधुनिक जीवनातल्या अत्यावश्यक सोयी उपलब्ध व्हाव्यात, असा जोरदार प्रयत्न झाला नाही. खेड्यांची भौतिक सुधारणा निधीच्या अभावी म्हणा अगर नियोजनात त्याला फारसे प्राधान्य न देता आल्यामुळे म्हणा, झालीच नाही. राहणीमान उंचावण्यासाठी नुसती भौतिक साधने उपलब्ध होऊन भागत नाही. आपला चरितार्थ त्या राहणीमानानुसार चालू शकेल, असा रोजगार खेड्यात उपलब्ध व्हावा लागतो. तरच खेडे हे आपल्या निवासाचे स्थान कायम राहते. आज खेड्यांतून दोन प्रकारचे लोक स्थलांतर करीत आहेत. एकतर जे श्रीमंत आहेत किंवा ज्यांना श्रीमंत होण्याची इच्छा आहे, असे लोक नजीकच्या शहरात राहावयास गेले आहेत. मुलांचे शिक्षण आणि पालकांचे राजकारण या दोन्हीसाठी कुटुंबाने शहरात स्थलांतर करणे आवश्यक वाटते. स्थलांतर करणारांचा दुसरा वर्ग म्हणजे काम

शोधणारा आणि खेड्यात मिळणाऱ्या वेतनाने भागू न शकणारा श्रमिकांचा वर्ग. हा वर्ग नजीकच्या छोट्या शहरात जात नाही. तो सरळ मुंबईसारख्या मोठ्या शहराची वाट धरतो; निदान जेथे कारखानदारी आली अशा कोल्हापूर, औरंगाबाद, नाशिक अशा शहरांकडे तरी वळतो. शेतावर काम करणाऱ्या सालकऱ्याला पन्नास वर्षांपूर्वी ४०० रुपये साल होते. आज ५०,००० रुपये झाले आहे. हे वेतन देणे परवडत नाही अशी शेतमालकाची तक्रार आहे; तर हे वेतनही आपल्याला पुरेसे नाही, असे सालकऱ्याला वाटते. ५०,००० रुपये वर्षाला म्हणजे साधारण ४,००० रुपये महिना. जर कारखान्यात तो कामाला गेला तर तेथे त्याला निदान ८००० रुपये मिळू शकतात. अर्थात सर्वांनाच अशी नोकरी लागते आणि त्यात आठ हजार रुपये मिळतातच असे नाही; पण शेतमजुरीपेक्षा अधिक मात्र जरूर मिळतात. पूर्वी शेतात प्रातःकाळी काम सुरू व्हावयाचे. आता दहा वाजल्याशिवाय मजूर शेतात येतच नाही. रोजगार हमी योजना आवश्यक आहे; पण तिचाही परिणाम श्रमसंस्कृतीच संपवण्यात होऊ लागला आहे. खेडी उद्‌ध्वस्त होऊ द्यावयाची नसतील, तर काही कठोर निर्णय घ्यावे लागतील. जवळजवळच्या चार-पाच खेड्यांचा एक गट करून तेथे एखादा छोटा उद्योग सुरू करता येईल का, याचा विचार करावा लागेल. शिवाय शेतीचे नियोजन करावे लागेल. आज शेतीचे नियोजनही बाजारच करतो. कापसाला भाव मिळतो. हे पाहिल्याबरोबर मराठवाड्यात गावोगाव ज्वारीपेरणी बंद होऊन कापसाची पेरणी सुरू झाली आणि ज्वारी हे गरिबाचे खाणे न राहता ती गव्हापेक्षा महाग झाली.

गांधीजींना खेड्यात नव्या सुखसोयी येऊ नयेत, असे मात्र बिलकूल वाटत नव्हते. शहरांप्रमाणे खेड्यांतही या सोयी उपलब्ध व्हाव्यात आणि खेडी ही सन्मानाने जगण्याची ठिकाणे असावीत, असेच त्यांना वाटे. गेल्या साठ वर्षांतील नियोजनात आपण पिण्याचे स्वच्छ पाणीही सर्वच खेड्यांत पोचवू शकलो नाही. सर्व खेड्यांत वीज, चांगले रस्ते व आरोग्यदायक सुविधा असलेली घरे निर्माण झाली, तर ही खेडी कुटीरोद्योगासाठी सक्षम होऊ शकतील. अशा रीतीने खेड्यांचा योजनाबद्ध विकास फारसा झालेलाच नाही. शहरांच्या भोवतीच उद्योगांचा विळखा कायम ठेवण्यात आल्यामुळे शहरांची त्यांचाच जीव गुदमरवणारी वाढ झाली. खेड्याचा रोजगार नष्ट झाल्यामुळे मोठ्या प्रमाणात खेड्यातून शहराकडे माणसांचे स्थलांतर झाले व आजही चालू आहे. आज शहरांमध्ये उद्योगधंद्यांची वाढ व्हायला जागाच नाही. शिवाय जर एखाद्या यंत्राचे सुटे भाग वेगळ्या ठिकाणी तयार करण्यात आले, तर ते भाग अधिक चांगले तयार करण्याचे संशोधन होण्याला चालना मिळते आणि उत्पादनाचा खर्चही कमी होतो, असे आजचे औद्योगिक व्यवस्थापनशास्त्र सांगते. या दृष्टीने अगदीच खेडी नाही तरी मुंबई, पुणे, दिल्ली आणि तत्सम शहरांपासून जरा दूर काही विकासकेंद्रे उभारावीत; म्हणजे खेड्यांतील लोकांना तेथे रोजगार मिळवणे सोपे होईल. अशा केंद्रांना शहराबरोबर जोडणारे रस्ते उत्तम असतील, तर अंतर हा आता फारसा अडचणीचा प्रश्न ठरत नाही. प्रत्येक खेड्यात सर्वच वस्तू तयार व्हाव्यात आणि तेथे होतील त्याच वस्तूंवर त्या लोकांनी भागवावे, हा आग्रह बरोबर नव्हता आणि आजच्या काळात तो टिकणारा नाही, हे खरे; परंतु याचा अर्थ सर्व खेड्यांतील सर्व बेकारांनी आपापल्या भागातील मुंबईकडेच धाव घ्यावी, असा अजिबात नाही. जे खेड्याचे पुनरुज्जीवन गांधीजींच्या मनात होते ते झाले नाही, तरी खेड्यांचे उद्‌ध्वस्तीकरण तरी होऊ नये, खेडी ओस पडू नयेत आणि तिथल्या लोकांची गर्दी शहरातल्या नव्या नव्या झोपडपट्ट्यांत होऊ नये, याची-तरी काळजी घेता येऊ शकेल.

राज्यघटना तयार होतानाच्या काळात खेड्यांसंबंधी विशेष तरतूद करण्याची व त्यांना अधिकार देण्याची श्रेष्ठींची मानसिकताच नव्हती. पुढे ७३ व्या घटनादुरुस्तीने १९९२ साली काही अधिकार आणि विषय पंचायतींकडे सोपवता येतील असे म्हटले व त्या विषयांची यादीही दिली. अर्थात त्यावर राज्यसरकारचे नियंत्रण कायमच ठेवले गेले आहे. घटनेच्या ११ व्या परिशिष्टात दिलेले शेती, लघुपाटबंधारे, जलसंधारण, मत्स्यपालन, ग्रामीण गृहरचना, रस्ते, पूल, ग्रंथालय वगैरे अधिकार सर्वच पंचायतींना दिले जावेत, असे घटनेत म्हटलेले नाही. योग्य त्या पंचायतींकडे सुपूर्द करता येतील, असा २४३

ग कलमात उल्लेख आहे. म्हणजे साधारणतः हे अधिकार जिल्हा परिषदांना (त्यांनाही पंचायतच मानले जाते) मिळू शकतील. त्यांनाही हे अधिकार देणारे कायदे किंवा जाहीरनामे बहुतेक राज्यसरकारांनी काढलेच नाहीत. ग्रामपंचायतींना काही विषय अगर त्यांचा मर्यादित भाग सोपवता येईल; परंतु तशी लोकप्रतिनिधींची तयारी अद्याप तरी दिसत नाही. एम. एन. श्रीनिवास यांच्यासारखे राज्यशास्त्राचे अभ्यासक अशा सूचनांना फारसे अनुकूल नाहीत. ग्रामपंचायतींना जादा अधिकार मिळाले, तर त्या अधिकारांचा उपयोग गावात बहुसंख्य असलेल्या जमातींना त्यांच्यावर अवलंबून असलेल्या छोट्या जमातींना डावलून आपल्याच जातीच्या फायद्यासाठी करण्याचा मोह होईल, अशी त्यांना भीती वाटते.[११] खेड्यांतील नवी-जुनी सत्ताकेंद्रे आणि त्यांचे संघर्ष यामुळे त्यांना अधिकार देऊ नयेत, हे म्हणणे बरोबर नाही. आपली राज्याची सरकारे आणि केंद्राचे सरकार हेही सगळे फारच चांगले चालते, हे खरे नाही. लोकशाहीत निर्माण होणारे दोष सगळीकडेच आले आहेत. त्यात निर्माण झालेल्या दोषां मुळे लोकशाही गुंडाळून ठेवता येणार नाही.

**यंत्रे का नकोत?**

यंत्रांना आपला असलेला विरोध का आहे, हे गांधीजींनी वेळोवेळी सांगितलेले होते. भारतामध्ये शेतीमध्ये काम करणारांना वर्षातले जवळजवळ सहा महिने काहीच काम नसते. ज्या ठिकाणी काम करणारे हात कमी आहेत, त्या ठिकाणी यंत्रे अधिक उपयोगाची असतात. येथेतर रिकाम्या हातांना काम कसे द्यावयाचे, हा प्रश्न आहे. म्हणून 'मला हातांचे काम करणारी यंत्रे नकोत', असे त्यांचे म्हणणे असे. 'जी यंत्रे माणसांचा रोजगार कमी करणार नाहीत आणि वस्तूंची निर्मिती अधिक चांगली करतील, त्या यंत्रांना आपला विरोध नाही', असेही त्यांनी सूचित केले होते. यंत्रांचा उद्देश काय असावा, त्याबद्दलची स्पष्ट कल्पना गांधीजींच्या मनात होती. एका वेगळ्याच माणसाला केंद्रस्थानी मानणाऱ्या दृष्टीने अर्थशास्त्राची मांडणी करणाऱ्या Small is Beautiful या ग्रंथाचे लेखक इ. एफ. शूमाकर यांनी माणसाला जिवंत राहण्यासाठी आणि आपली क्षमता वाढवण्यासाठी जे काम करावे लागते, ते अधिक सुसह्य व सोपे करणे हे तंत्रज्ञानाचे प्राथमिक उद्दिष्ट आहे, असे म्हटले आहे.[१२] गांधीजींची हीच भूमिका होती. मोठ्या प्रमाणावर उत्पादन करणाऱ्या यंत्रणांना गांधीजींचा विरोध ते माणसांचा रोजगार कमी करतात म्हणून होता; पण माणसाचे काम सुसह्य किंवा नेटके करणाऱ्या आणि रोजगारही कायम ठेवणाऱ्या यंत्रास त्यांचा विरोध नव्हता. शेतीच्या औजारापासून चरख्यापर्यंत छोट्या तंत्रज्ञानाचा उपयोग करून ती सुधारण्यास त्यांचा पाठिंबाच होता. शूमाकर यांनी हे जे छोट्या प्रमाणावरच्या उत्पादनांना मदत करणारे तंत्रज्ञान आहे, त्याला Intermediate technology असे नाव दिले आहे. जी छोटी यंत्रे किंवा हत्यारे मोठ्या संख्येने काम करणाऱ्या माणसांना उपयुक्त ठरतात, त्यांना विकसित करणाऱ्या या तंत्रज्ञानाचा उपयोग जेथे श्रमजीवीची संख्या जास्त आहे, अशा भारतासारख्या देशांना व त्यांतील खेड्यांना होईल, अशी अपेक्षा करणे स्वाभाविक आहे. अगदी अलीकडे तंत्रविज्ञानात एक नवा विषय चर्चिला जात आहे. Nanotechnology (सूक्ष्मतंत्रशास्त्र) हा तो विषय आहे. छोट्या प्रमाणावर होणारे उत्पादन किंवा तांत्रिक काम सोपे व चांगले करण्यासाठी कमीत कमी जागेचा अधिकाधिक वापर करून यंत्रे लहान आकाराची तरीही मोठ्या आवाक्याची करणारे हे तंत्रज्ञान भारतीय खेड्यांच्या जीवनव्यवहारात यशस्वीपणे वापरता येईल, असे या तंत्रज्ञानपुरस्कर्त्यांचे म्हणणे आहे. सुधींद्र कुलकर्णी यांना गांधीजी हयात असते, तर त्यांनी संगणकाचे आणि इंटरनेटचे स्वागत केले असते, असे वाटते.[१३]

ग्रामीण भारतातील शेतीवर अवलंबून असलेले शेतमालक आणि शेतमजूर यांना पूरक म्हणून कुटीरोद्योग उपलब्ध करून द्यावेत, असे त्यांचे प्रतिपादन होते. गांधीजींच्या या विचाराची प्रत्यक्ष अंमलबजावणी स्वातंत्र्यपूर्व काळात त्यांच्या कार्यकर्त्यांपुरती सुरू झाली होती. श्रमाचे महत्त्व सांगण्यासाठी गांधीजींनी अशा छोट्या उपक्रमांना उत्तेजन दिले. वर्ध्यात आणि जवळपास व इतरही काही ठिकाणी चर्मोद्योग, साबण आणि तत्सम वस्तू तयार करणारी छोटी केंद्रे चालवली गेली. या व्यवसायांत सर्व जातींचे लोक सामील झाले. अमुक एक व्यवसाय अमक्या जातीनेच करावा, हा

परंपरेचा दंडक गांधीजींनी मोडून काढला. अर्थात ही चळवळ फारच मर्यादित होती.

ज्या वेळी खेड्यांतले कुटीरोद्योग, बलुतेदारांचे व्यवसाय, हस्तकलांची उत्पादने कमी होतात किंवा लयाला जातात, त्या वेळी असे व्यवसाय करणारे लोक हे नाइलाजाने शेतमजूर होतात. शेती करणाऱ्यांना मोठ्या प्रमाणात व कमी मोबदल्यात मजूर उपलब्ध होतात. गांधीजींनी चरखा हे गरीब माणसाच्या स्वावलंबनाचे आणि परकीय सत्तेविरुद्ध लढण्याच्या त्याच्या निश्चयाचे प्रतीक बनवले. आपल्या श्रमातून मिळणारा रोजगार त्या व्यक्तीची प्रतिष्ठा वाढवील, हेही त्यांचे गणित होते. गांधीजी ज्या वेळी हस्तव्यवसायाला उत्तेजन देण्याबद्दल बोलत, त्या वेळी त्यांचा निर्देश श्रीमंत ग्राहकांना संग्रही ठेवाव्या वाटणाऱ्या शोभेच्या वस्तूंकडे नसे. ज्या वस्तू प्रत्यक्ष उपयोगाच्या आहेत व ज्या आज उपयोगिल्या जातात, त्या वस्तूंच्या उत्पादनाचा गांधीजी पुरस्कार करीत. भारताच्या नियोजनात मात्र अगदी पहिल्या आणि दुसऱ्या पंचवार्षिक योजनेतही लघुउद्योग हे मुख्यतः शहरांतच वाढतील व स्थापित केले जातील, असे गृहीत धरण्यात आले होते. खादी आणि सुताचे उत्पादन तर आता खादी ग्रामोद्योग बोर्डाच्या उत्पत्ती केंद्रातच प्रामुख्याने चालू असते. खेड्यांतील शेतमजुराचा जोडव्यवसाय म्हणून चरखा केव्हाच आपले स्थान गमावून बसला आहे.

संपूर्ण दारूबंदीची घटनेत तरतूद असावी, असे गांधीजींचे आणि गांधीवाद्यांचे मत होते. ब्रिटिश राजवटीपासून अफू आणि दारू ही सरकारी उत्पन्नाची महत्त्वाची साधने होती. स्वातंत्र्यानंतरची सरकारेसुद्धा हे उत्पन्न गमावण्यास फारशी उत्सुक दिसत नाहीत. मुंबई प्रांतात दारूबंदीचा झालेला प्रयोग बेकायदेशीर दारू गाळण्याचा उद्योग निर्माण होण्यात परिवर्तित झाला. आज गुजरातमध्ये अशी दारूबंदी अस्तित्वात आहे; परंतु तिच्या यशस्वितेबद्दल आणि आवश्यकतेबद्दल कोणत्याच राजकीय पक्षाला फारसा विश्वास नाही. टेकचंद समितीने १९६४ साली दिलेल्या अहवालात दारूचे सेवन नियंत्रित आणि प्रतिबंधित करण्यासाठी उपाययोजना करावी, अशी शिफारस करून काही उपायही सुचवले. राज्य सरकारांनी काही उपाययोजना जाहीरही केल्या; पण त्यांच्या काटेकोर अंमलबजावणीकडे लक्षच दिले गेले नाही. काही सरकारांची आपल्याच नियमात असलेल्या उपायांवर श्रद्धा नसते.

गांधीविचाराप्रमाणे करावयाच्या राज्यघटनेत तुरुंग आणि पोलीस यांना फारसे महत्त्वाचे स्थान नव्हते. गुन्हेच क्वचित घडतील आणि त्यांनाही परंपरागत शिक्षा देण्याची गरज पडणार नाही, असे ते गृहीत होते. आज असे गृहीत धरता येण्यासारखी स्थिती नाही. आज जीवन इतके गुंतागुंतीचे झाले आहे, की त्याच्या नियमनासाठी मोठ्या संख्येने कायदे लागतात. कायद्यांची गुंतवळ बेसुमार वाढली. ग्रामपंचायतींना हे कसे पेलवणार ? न्यायालयांची आवश्यकता दिवसेंदिवस वाढत आहे व या व्यवस्थेपासून मुक्ती मिळेल, असा संभव दिसत नाही. विकासकामांचे अनुदान केंद्र आणि राज्य सरकारांकडून येते, गावात जमा होणारा ग्रामपंचायतीचा कर आणि जमीनमहसूलही गावाच्या विकासाला पुरा पडू शकत नाही. तेव्हा आपल्या प्रगती आणि विकासासाठी खेडी पूर्णपणे राज्य सरकार आणि केंद्र सरकारवर अवलंबून आहेत. गांधीजींनी स्वावलंबित्व हा स्वातंत्र्याचा आणि स्वायत्ततेचा पाया मानला. आजच्या काळात विकासोन्मुख खेडे आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी असू शकत नाही. तसेच विकसनशील देशसुद्धा संपूर्णपणे स्वावलंबी आणि इतर देशांकडून मदत आणि कर्ज यांच्यापासून मुक्त राहू शकत नाहीत.

**घटनानिर्मितिप्रक्रियेपासून दूर**

घटनेच्या निर्मितिप्रक्रियेपासून आता अलिप्त राहायचे, हा निर्णय मनोमन घेतल्यांनतर गांधीजींनी इतर कामांना प्राधान्य दिले. १९४६ च्या मेमध्ये सिमल्यामध्ये झालेल्या दुसऱ्या राजकीय नेत्यांच्या परिषदेला गांधीजी उपस्थित होते आणि घटनासमिती निर्माण होण्याला मदतही करत होते; घटनासमितीच्या कामकाजापासून मात्र ते पूर्णपणे अलिप्त होते. १९४६ साली विधिमंडळासाठी ज्या निवडणुका झाल्या, त्या निवडणुकांसाठी काँग्रेस पक्षाने एक जाहीरनामा प्रसिद्ध केला होता. या बाराकलमी जाहीरनाम्यात सर्व नागरिकांना समान अधिकार व विकासाची समान संधी, सामाजिक दृष्ट्या जे अन्यायाचे बळी झाले, त्यांच्या अधिकारासाठी विशेष तरतूद आणि सर्व नागरिकांना मूलभूत हक्क अशा आश्वासनांबरोबरच काँग्रेस संघराज्यात्मक घटनेची पुरस्कर्ती आहे व त्यातील






घटकांना (प्रांतांना) पुरेशी स्वायत्तता देण्याला ती बांधील आहे, असे म्हटले होते. त्याचबरोबर आणखी एक गोष्ट या जाहीरनाम्यात स्पष्टपणे नमूद करण्यात आली होती. उद्योगधंद्यांचे आणि शेतीचे आधुनिकीकरण करण्याचा काँग्रेसचा मानस आहे, हेही या जाहीरनाम्यात म्हटले होते. उत्पादनाची साधने आणि वितरणाची व्यवस्था यांवर सामाजिक नियंत्रण असावे, असेही काँग्रेसचे धोरण असेल याचाही उल्लेख होता. या जाहीरनाम्याच्या आधारे ज्या प्रांतिक विधिमंडळाच्या निवडणुका झाल्या, त्यांतूनच घटनासमिती निर्माण झाली.

१९४६ साली गांधीजींनी देशाच्या अनेक भागांत जो दौरा केला, त्यात त्यांनी विधायक कार्यक्रमाला विशेष प्राधान्य दिले होते. राजकीय स्वातंत्र्य मिळेलच; पण व्यक्तीचे आणि देशाचे खरे स्वातंत्र्य व्यक्तीच्या आणि देशाच्या स्वावलंबनावर अवलंबून असेल, यावर त्यांची श्रद्धा होती. ७ ते ११ डिसेंबर १९४५ या काळात कोलकात्यामध्ये काँग्रेस कार्यकारिणीची एक बैठक झाली. या काळात बहुसंख्य काँग्रेसकार्यकर्ते स्वातंत्र्याच्या आगमनाची वाट पाहत होते. येणारी राजकीय सत्ता कशी राबवता येईल, याचा विचार करीत होते. अशा परिस्थितीत गांधीजींनी कार्यकारिणीकडून एक ठराव संमत करून घेतला. या ठरावात असे म्हटले होते, की "सूतकताई, खादी यांसारखे विधायक उपक्रम हे अहिंसेचे प्रतीक आहेत आणि म्हणून काँग्रेसच्या इतर सर्व– अगदी संसदीय कार्यक्रमापेक्षाही ते अधिक महत्त्वाचे आहेत. सविनय कायदेभंग किंवा इतर तत्सम मार्गांना विधायक कार्यक्रमांची जोड असल्याशिवाय पूर्णत्व येऊ शकत नाही. म्हणून भारतीयांनी जास्तीत जास्त प्रमाणात विधायक कार्यक्रमांकडे लक्ष वळवावे."[१४] ठराव संमत झाला असला, तरी या ठरावाचा प्रभाव पडण्याची फारशी शक्यता नव्हती. देशातील अन्नधान्याची तीव्र टंचाई, देशाच्या फाळणीची शक्यता आणि त्यातून उद्भवणारे अनेक प्रश्न यामुळे राजकीय कार्यकर्तेही व्यग्र होते. सत्तेच्या आगमनाचे औत्सुक्य हा सहजधर्म होता. गांधीजींसारखा एखादा महात्मा वगळला, तर इतर सर्वांना ते असणे स्वाभाविक होते. स्वातंत्र्यानंतर निदान काही काँग्रेस कार्यकर्त्यांनी संसदीय राजकारणात अडकून न पडता संघटनेमार्फत विधायक काम करीत राहावे, अशी गांधीजींची अपेक्षा या ठरावात व्यक्त झाली होती.

खेडे स्वावलंबी होऊ शकत नाही व स्वायत्तही होऊ शकत नाही, हा निष्कर्ष थोडा बाजूला ठेवून आणखी काही प्रश्न विचारात घेणे आवश्यक आहे. प्रशासनिक घटक म्हणून खेडे का मानले गेले नाही? अधिकारांची वाटणी करताना राज्ये, केंद्र यांच्यात जशी वाटणी झाली तसे काही अधिकार पंचायतींना का देण्यात आले नाहीत? या प्रश्नांचे सरळ उत्तर अशा विकेंद्रीकरणावर घटनाकारांचा विश्वास नव्हता, हेच आहे. ज्या वेळी पंचायतींना अधिकार का दिले जात नाहीत, असा प्रश्न उपस्थित करण्यात आला, त्या वेळी राज्य सरकारे त्यांना अधिकार देऊ शकतील, असे उत्तर देण्यात आले. म्हणजे राज्य सरकार आपल्या अधिकारांतले काही अधिकार पंचायतीकडे सुपूर्द करू शकेल, त्याचप्रमाणे ते काढूनही घेऊ शकेल. घटनात्मक संरक्षण असलेले घटक म्हणून घटना तयार होताना पंचायतींना मान्यता दिली गेली नव्हती. पुढे जवळजवळ पन्नास वर्षांनी दुरुस्ती करून नगरपालिका आणि पंचायती यांना घटनात्मक दर्जा देण्यात आला. मात्र हा दर्जा त्यांच्या निवडणुका वेळेवर व्हाव्यात एवढ्यापुरताच मर्यादित आहे. या दुरुस्तीद्वारे त्यांना अधिकार देण्यात आलेले नाहीत; द्यावयाचे असतील तर देता येतील, अशी ती दुरुस्ती आहे. नियोजनासाठी खेडे हा घटक मानता येणार नाही, हा धनंजयराव गाडगिळांचा निष्कर्ष सर्वांनीच मान्य केलेला दिसतो.

गांधीजींची दुसरी कल्पना अशी होती, की ग्रामपंचायत वगळता पुढील सर्व निवडणुका या अपत्यक्ष मतदानाने व्हाव्यात. गेल्या साठ वर्षांचा निवडणुकींचा जो अनुभव आपण घेतला आहे, त्यात अप्रत्यक्ष मतदान हे घोडेबाजाराला मदत करणारे ठरते, असे दिसले. राज्यसभा, विधान परिषद, बाजार समित्या, नगर परिषदा या सर्व निवडणुकांत मतांची पैशातील किंमत वाढत वाढत गेलेली आहे. आजतर पुष्कळ वेळा उघडपणे मतदार पैसे मागताना दिसतात. या सर्व प्रकारात आपली प्रांतिक सरकारे आणि केंद्र सरकार कसे बनले असते?

सरळ आणि प्रत्यक्ष मतदानाने निवडणुका होताना त्यात गैरप्रकार होत नाही असे नाही; पण तरीही अनेक वेळा लोक शहाणपणाने मतदान करतात आणि दगडविटांची तुलना करून त्यातल्या त्यात बऱ्या उमेदवाराला निवडून देतात, निदान तसा प्रयत्न करतात. अप्रत्यक्ष मतदानात तसेही होऊ शकणार नाही.

गुन्हेगारीला प्रतिबंध आणि शांततारक्षण यात अनेक शस्त्रे आणि साधनांनी युक्त असलेले पोलिसदलही आज अकार्यक्षम ठरते आहे. अशा वेळी शिक्षा देण्याची गरजच पडणार नाही, असे गृहीत धरून कमीत कमी रक्षकांच्या साहाय्याने शांतता राखण्याची कल्पना कोणत्याही राज्यकर्त्यांना करता येणार नाही. स्वायत्त आणि स्वयंपूर्ण खेडे हा पायाभूत घटक, अप्रत्यक्ष मतदान, सहकारी तत्त्वावर खेड्यातील बहुतेक अर्थव्यवहार या गांधीजींच्या कल्पना प्रत्यक्षात येऊ शकल्या नाहीत. ग्रामपंचायती, सहकारी संस्था आणि इतर सत्तापदे ही सेवेची साधने राहिलीच नाहीत; तर ती मानापानाची, खोट्या श्रेष्ठत्वाची आणि म्हणून संघर्षाची आणि द्वेषाची कारणे बनली आहेत. शहर आणि खेडी यांच्यात गुन्हेगारी, हिंसक वृत्ती आणि विविध समाजघटकांतील कटुता यांबाबतीत फारसा फरक राहिलेला नाही.

आज राजकारण, त्यातही सत्ताकारण हेच सर्वांना महत्त्वाचे वाटते आहे. रचनात्मक कार्य करावे, असे वाटणारे काही तरुण ठिकठिकाणी पुढे येत असले, तरी ज्यांच्या हातात सत्ता प्रामुख्याने असते, ती राजकारणातील मंडळी मात्र अशा कार्यक्रमाकडे प्रसिद्धीची एक बाब म्हणून फक्त पाहतात. या परिस्थितीत महात्मा गांधी हे विचारांची प्रेरणा देणारे एक स्रोत म्हणून फारसे उपयोगाचे भारतीय राजकारणात तरी राहिलेले दिसत नाहीत. दुसरीकडे जगभर अनेक राजकीय क्रांत्यांमध्ये, सामाजिक आशय असलेल्या क्रांत्यांमध्ये महात्मा गांधी आणि त्यांचे विचार यांपासून स्फूर्ती घेतलेल्यांची संख्या लक्षणीय आहे. अमेरिकेतील कृष्णवर्णीय नागरिकांना समान अधिकार मिळवून देण्यासाठी झगडणारे आणि बलिदान करणारे मार्टिन ल्यूथर किंग (ज्युनियर), दक्षिण आफ्रिकेला वसाहतवादी जोखडातून मुक्त करणारे नेल्सन मंडेला, पोलंडला कम्युनिस्टांच्या हुकूमशाही राजवटीतून सोडवणारे लेक वालेसा, झेकोस्लोव्हाकियात राजकीय क्रांतीबरोबरच नवा मानवतावादी विचार मांडणारे वॅक्लॅव्ह हॅवेल, तिबेटच्या स्वायत्ततेसाठी आयुष्यभर झगडणारे दलाई लामा या सर्वांनी गांधीजींच्या विचारांचे ऋण मान्य केले आहे.

एक गोष्ट मात्र लक्षात घेतली पाहिजे. पारतंत्र्यातून मुक्त होऊन स्वतंत्र होण्यासाठी आणि मानवी हक्क मिळवण्यासाठी जगभर झालेल्या लढ्यांना गांधीजींच्या विचारांनी प्रेरणा दिली. अहिंसक पद्धतीनेही लढता येते, हा विश्वास जागृत केला.अविकसित देशांच्या जोहान्सबर्ग परिषदेसारख्या एखाद्या मेळाव्यात गांधीजींचे स्मरण करीत 'समान अधिकार आणि समान विकास' असे सूत्र सर्वांनी स्वीकारले. हे झाले असले, तरी आपापल्या देशात साधेपणा, व्यक्तीच्या गरजा मर्यादित ठेवणे, खेड्यासारख्या कनिष्ठ स्तरावर परस्परसहकार्याचे जीवन जगणे, मानवी श्रमाला पूर्ण वाव असलेली उत्पादनव्यवस्था चालवणे या गोष्टींना प्राधान्य देणारी राजकीय व्यवस्था स्थापन करण्याचा प्रयत्न यांपैकी ज्यांच्या हातांत सत्ता आली, त्यांनीही केलेला दिसत नाही.

धर्माच्या नावावर होणारी हिंसा आणि ती करणारे दहशतवादी यांना सर्व जग घाबरून आहे. धर्म, शासनसंस्था, शिक्षण आणि सहकार अशा गोष्टींनी सामंजस्य वाढेल, माणसे एकमेकांना समजून घेतील, जगातली साधनसंपत्ती ओरबाडून घेण्याऐवजी तिचे न्याय्य वाटप व्हावे व तिच्यात वृद्धी व्हावी असा प्रयत्न करतील, अशी आशा विचारवंतांनी बाळगली. प्रत्यक्षात या गोष्टींतूनसुद्धा हिंसेला आणि पशुत्वालाच बळ मिळताना दिसत आहे. अशा वेळी गांधीजींचेच स्मरण पुन्हा जगाला होते आहे. व्यक्तीचे स्वातंत्र्य अबाधित राहिले तरच देशाचे स्वातंत्र्य राहील, असे गांधीजींनी मानले. बाह्य बंधनापासून शक्य तेवढे मुक्त राहता यावे म्हणून त्यांनी स्वावलंबनाचा उपाय सुचवला. त्यांनी मांडलेला घटनात्मक व्यवस्थेचा आराखडा उपयुक्त वाटला नाही, तरी गांधीजींच्या विचारांशी भारतीय घटनेने पूर्ण फारकत घेतलेली नाही. घटनेची उद्देशिका गांधीजींचेच विचार सांगते आहे. घटनेत नमूद केलेले मूलभूत हक्क गांधीजींच्या त्याबद्दलच्या आग्रहाचे स्मरण करून देत आहेत. धर्माच्या










आधारावर देशाची फाळणी होऊनही भारत हा एक धर्मनिरपेक्ष देश म्हणून जन्माला आला, याचेही श्रेय गांधीजींचेच आहे. मार्गदर्शक तत्त्वांमधील अनेक तरतुदी गांधीजींच्या मार्गाने जा, असा निर्देश करीत आहेत. गांधीजींसारखे मार्गदर्शक रस्ता दाखवत असतात. त्या रस्त्याने जायचे की नाही, हे शेवटी देशातले राजकीय बहुमत ठरवत असते. बहुमताने घेतलेले निर्णयच अमलात आणावे, असे सांगणारी लोकशाही आणण्यासाठीसुद्धा गांधीजीच कारणीभूत झालेले असतात.

**संदर्भ -**


1. H. Fukazawa, in The Cambridge Economic History of India, Vol.2 - 1757 to 2003 (Ed. Dharma Kumar), Orient Longman- 2004. P. 339.
2. Constituent Assembly Debates, Reprint, Loksabha Secretariat, New Delhi, 1985, Book 3, P. 39.
3. Marx Karl, British Rule in India, Article, New York Herald Tribune, 25 June 1853, Quoted in Music of the Spinning Wheel, P. 7.
4. Satish Kumar, Gandhi's Swadeshi : The Economics of Permanace, http:/ Carvan.Squat.net
5. Sudheendra Kulkarni, Music of the Spinning Wheel; Amaryllis, New Delhi, 2012.
6. Sivarama Krishnan, Kundu & Singh, Oxford Handbook of Urbanization In India, Oxford University Press, New Delhi, 2007, P. 5.
7. Ashok Mehta : Studies in Asian Socialism, Bharatiya Vidya Bhavan, Bombay, 1959. P. 215.
8. Jayprakash Narayan : Towards a New Society Asian Affairs, Congress for Cultural Freedom, New Delhi, 1958. P. 73-4, 92.
9. Siby K. Joseph : Community of Ark; Hind Swaraj Perspectives in Practice, Gandhi Marg, Vol. 31 No. 2 , July-Sept. 2009.
10. D.R.Gadgil: Planning for Agricultural Development in India : Address at 13th Annual Conference of the Indian Society of Agricultural Statistics. Sangam Press, Poona, 1960.
11. M.N. Shrinivas......quoted in Gunnar Myrdal : Asian Drama; Vol. 1, Penguin Books, London, 1968, P. 299.
12. Schumacher E. F., Small is Beautiful, Study of Economics as if People Mattered, Radha-krishna, New Delhi, 1977, P.138.
13. Kulkarni Sudheendra, Music of the Spinning Wheel, P.363-7.
14. Tendulkar D. G., Mahatma, Publications Division, New Delhi, 1969, Vol. 7, P. 22.

# नेहरूंचे परराष्ट्धोरण

प्रा. विठ्ठल दहिफळे

भारताच्या परराष्ट्र धोरणाचे शिल्पकार म्हणून पंडित जवाहरलाल नेहरूंचा गौरव केला जातो. देशाच्या पंतप्रधानपदी साडेसतरा वर्षे ते राहिले. आपल्या कार्य-काळात परराष्ट्रखाते त्यांनी स्वतःकडेच ठेवल्यामुळे आणि त्यांची थेट गुंतवणूक सर्वाधिक राहिल्यामुळे भारताच्या परराष्ट्रधोरणाचे शिल्पकार, आधुनिक भारताचे निर्माते आदी बिरुदावल्या त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला चिकटल्या गेल्या. गमतीची बाब म्हणजे भारतीय लोकांनी केलेला हा त्यांचा गौरव त्यांनी सविनय नाकारला आहे. एके ठिकाणी भाषणात ते म्हणाले होते की, "हल्ली माझी संभावना भारताच्या परराष्ट्र धोरणाचे शिल्पकार अशी केली जात आहे, परंतु मला ती अयोग्य वाटते. कारण या देशाच्या विदेशनीतीची पाळेमुळे इतिहास व संस्कृतीत खोलवर रुजली आहेत. भारतीय स्वातंत्र्य आंदोलनाच्या धगधगत्या यज्ञकुंडातून साकार झालेल्या मूल्यांचा प्रभाव विदेशनीतीवर आहे. त्यामुळे मी विदेशनीतीचा रचनाकार नसून भाष्यकार आहे. या देशाच्या संस्कृतीने अगोदरच जोपासलेल्या मूल्यांना मी केवळ शब्दबद्ध केले आहे." यावरून त्यांच्या प्रामाणिकपणाची प्रचिती येते.

जवाहरलाल नेहरूंनी भारतीय विदेशनीतीच्या रचनेचे श्रेय नाकारले असले, तरी त्यांच्या योगदानाचे महत्त्व मुळीच दुर्लक्षित करता येत नाही. पाश्चिमात्य उदारमतवादी संस्कारांचा प्रभाव असलेल्या नेहरूंचा आंतरराष्ट्रीय राजकारणाप्रति असलेला व्यासंग इतका भारदस्त होता, की त्यांच्या भूमिकांना विरोध करण्याचे सामर्थ्य खुद्द त्यांच्या मंत्रिमंडळातीलच काय, तर विरोधी बाकांवरील लोकांकडेही नव्हते. पंतप्रधानपदाच्या कार्यकाळात परराष्ट्रमंत्रिपद स्वतःकडे ठेवल्यामुळे आपल्या अग्रक्रमांना ते व्यवस्थितपणे न्याय देऊ शकले. आंतरराष्ट्रीय राजकारणावरील नेहरूंच्या आकलनाबाबत खुद्द गांधीजींनी एके ठिकाणी असे म्हटले होते की, "जवाहरच्या राजकीय भूमिका माझ्या सान्निध्यात घडत गेल्या असल्या, तरी आंतरराष्ट्रीय राजकारणात मी त्याचा शिष्य आहे." यावरून नेहरूंच्या व्यासंगाची सहज कल्पना येते.

भारताच्या परराष्ट्रधोरणावर नेहरूंच्या व्यक्तिमत्त्वाची अमिट छाप उमटली असली, तरी त्यांचे परराष्ट्रधोरणाविषयीचे आकलन कसे पुष्ट होत गेले? किंवा त्यांच्या भूमिकांचे वैचारिक स्रोत कोणते होते? तसेच त्यांच्या कार्यकाळात आंतरराष्ट्रीय स्थिती कशी होती? आणि तिच्या गरजा आणि मान्यता काय होत्या? हे समजून घेतल्याशिवाय नेहरूकालीन परराष्ट्रधोरणाचे मूल्यमापन करणे अन्यायकारक होईल. नेहरूकालीन भारताच्या परराष्ट्रधोरणाचे स्वरूप समजून घेताना त्याच्या ऐतिहासिक व सांस्कृतिक संदर्भाकडे दुर्लक्षकरता येत नाही. गौतम बुद्धांचा प्रज्ञा, शील व करुणेचा विचार असेल किंवा वर्धमान महावीरांचा शांतीसंदेश; ज्ञानेश्वरांची 'वसुधैव कुटुंबकम्' ची कल्पना असेल वा रानड्यांचा उदारमतवाद; महर्षी अरविंदांचा अध्यात्मवाद असो की, टागोरांचा आंतरराष्ट्रीयवाद; टिळकांचा कणखर बाणा असो की गांधीजींचा शांती, सहजीवन आणि अहिंसावाद; नेहरूंच्या परराष्ट्रविषयक भूमिकांवर त्यांचा खोलवर प्रभाव पडला आहे. 'पंचशील तत्त्वे' हे त्याचे ठळक उदाहरण आहे. भारतीय राष्ट्रीय काँग्रेसच्या सहवासातही नेहरूंच्या परराष्ट्रविषयक भूमिका अधिकाधिक पुष्ट होत गेल्या. दादाभाई नौरोजींपासून ते गांधीपर्यंत काँग्रेसमधील महनीय विभूतींच्या विचारप्रकाशात नेहरूंचे परराष्ट्रधोरण उजळून निघत गेले. ज्या काळात नेहरूंचा सार्वजनिक जीवनातील वावर अधिक चपखलपणे घडत होता, त्या काळात सार्वभौमत्वाच्या प्राप्तीसाठी वसाहतवादाला बळी पडलेल्या राज्यांचा संघर्ष जागतिक राजकारणाच्या पृष्ठभागी होता. यामुळे त्यांच्या परराष्ट्रधोरणात राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या जतन आणि संवर्धनाचा प्रश्न शिरोभागी राहिला आहे. नामिबिया,

अंगोला, ट्यूनिशिया आदी देशांच्या स्वातंत्र्य आंदोलनाला भारताने आपला जाहीर राजनैतिक पाठिंबा दर्शविला होता. स्वातंत्र्याचे मोल त्यांनी ओळखले होते. तिसऱ्या जगाच्या स्वाभिमानासाठी ते आयुष्यभर झगडत राहिले. द. आफ्रिकेतील कृष्णवर्णीयांच्या नागरी अधिकारांबाबत संयुक्त राष्ट्र संघटनेचे दरवाजे त्यांनी ठोठावले.

स्वातंत्र्यपूर्व काळात वाढत गेलेल्या हिंदू-मुस्लिम दुराव्याचाही नेहरूकालीन परराष्ट्रधोरणावर प्रभाव पडला आहे. स्वतंत्र भारताची संस्थात्मक बांधणी कशी असावी, याबाबत काँग्रेस आणि मुस्लिम लीग यांच्यात जसे मतभेद होते, तसेच जागतिक व्यवस्थेप्रतीच्या आकलनातही एकवाक्यता नव्हती. या पार्श्वभूमीवरच स्वातंत्र्योत्तर काळात भारताच्या धर्मनिरपेक्षतावादी भूमिकांकडे आणि मध्यपूर्वेसंदर्भातील धोरणांकडे बघितले पाहिजे. अल्पसंख्याक मुस्लिम बांधवांच्या अधिकारसुरक्षेचा प्रश्न भारतीय राजकारणात यामुळेच पृष्ठभागी आला आहे. नेहरूंपासून आजपर्यंत अरब-इस्राईल संघर्षात भारताने अरबांची न्याय्या बाजू उचलून धरली आणि इस्रायल व अमेरिकादी दोस्त राष्ट्रांचा रोष ओढवून घेतला. विरोधकांना यात मुस्लिमांप्रतीच्या तुष्टीकरणाची बीजे दिसली. असे असले तरी, देशांतर्गत आणि परराष्ट्रधोरणात, धर्म-निरपेक्षतेच्या मूल्याचा स्वीकार केल्यामुळे, एकहाती नेतृत्व असलेल्या नेहरूप्रणीत काँग्रेसला हिंदू आणि मुस्लिम अशा दोन्ही बाजूंकडील मूलतत्त्ववाद्यांवर हल्ला चढविता आला, ही जमेची बाजू आहे. आणि महत्त्वाचे म्हणजे नेहरूंना अनेक आघाड्यांवर विरोध करणाऱ्या डाव्यांची याकरिता साथ मिळत गेली, हे विशेष.

कोणत्याही देशाच्या परराष्ट्रधोरणावर समकालीन आंतरराष्ट्रीय स्थिती आणि मान्यतांचा प्रभाव पडत असतो. याला नेहरूकालीन विदेशनीतीही अपवाद असू शकत नाही. नेहरूंकडे ज्या वेळी भारताच्या परराष्ट्रधोरणाची सूत्रे आली, त्या वेळी साम्राज्यवादी राज्यांविरुद्ध वासाहतिक राष्ट्रांचा स्वातंत्र्यासाठीचा संघर्ष सुरू होता. जगभर स्वातंत्र्याचे पडघम वाजत होते. दुसऱ्या जागतिक महायुद्धात शक्तिक्षय झालेल्या साम्राज्यवादी, वसाहतवादी राज्यांना साम्राज्याचा डोलारा पेलणे अशक्यप्राय झाल्यामुळे निर्वसाहतीकरणाच्या प्रक्रियेला वेग आला होता. नेहरूंनी या प्रक्रियेचे स्वागत करून राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठी झगडणाऱ्या राष्ट्र-राज्यांना सर्वतोपरी मदत केली. परिणामी आशिया, आफ्रिका व लॅटिन अमेरिकेतील बव्हंशी राज्ये स्वतंत्र झाली. '', 'आफ्रिकन लोकांसाठी आफ्रिका' अशा घोषणा निनादू लागल्या. आफ्रो-आशियायी राज्यांत नवजागरण घडून स्वतंत्र राष्ट्रवादाचा विकास झाला. येथे मार्गदर्शकाच्या भूमिकेत नेहरू वावरत असल्याचे दिसतात.

दुसऱ्या महायुद्धाच्या समाप्तीनंतर आंतरराष्ट्रीय राजकारणाची समीकरणे वेगाने बदलत गेली. युरोपचे खच्चीकरण झाले. अमेरिका-सोव्हिएत रशियादी बलाढ्य राष्ट्रांचे युद्धकाळातील प्रेम आटले; त्याची जागा पारस्परिक द्वेषाधारित कुरघोडीच्या राजकारणाने घेतली. परस्परविरोधी विचारप्रणालीमुळे जागतिक राजकारणाचे द्वि-ध्रुवीकरण झाले. अमेरिका आणि तिच्या वर्चस्वाखालील राज्ये हे पहिले जग, सोव्हिएत रशिया व त्याच्या प्रभुत्वाखालील राज्ये हे दुसरे जग आणि उर्वरित नवस्वतंत्र मागास राज्ये हे तिसरे जग अशी जगाची विभागणी झाली. तिसऱ्या जगातील राज्यांना आपल्या गटात सामील करून घेण्यासाठी अक्षरशः रस्सीखेच सुरू झाली. मदतीचे राजकारण सुरू झाले. युद्ध झालेच तर परस्परांवर मात करण्यासाठी नाटो, सिएटो, सेन्टो आणि वॉर्सा पॅक्टसारख्या लष्करी संघटनाही बांधल्या गेल्या. संयुक्त राष्ट्रसंघटनेच्या स्थापनेचा उदात्त हेतू संपुष्टात येतो की काय, अशी स्थिती निर्माण झाली. या पार्श्वभूमीवर जवाहरलाल नेहरूंनी सत्तासंघर्षाच्या राजकारणात अडकून न पडता स्वतंत्र राहण्याचा निर्धार केला. यातूनच स्वतंत्र अशा अलिप्ततावादी तत्त्वज्ञानाचा उदय झाला.

महासत्तांच्या सत्ता-संघर्षाच्या राजकारणापासून अलिप्त राहण्याच्या भूमिकेची पायाभरणी ही तशी १९५५ सालच्या बांडुंग येथे झालेल्या आफ्रो-आशियाई राज्यांच्या शिखरपरिषदेतच झाली होती. ईजिप्तचे अध्यक्ष नासेर, युगोस्लव्हियाचे अध्यक्ष टिटो, इण्डोनेशियाचे डॉ. सुकार्णो, घानाचे क्वामे एक्रूमा आदी लोकनेत्यांनी नेहरूंच्या मार्गदर्शनाखाली अलिप्त राष्ट्रांच्या संघटनेची संस्थात्मक बांधणी केली. १९६१ साली संघटनेची पहिली शिखर परिषद युगोस्लोव्हियाची राजधानी बेलग्रेड येथे पार पडली;






तर आजमितीला ११८ सदस्यसंख्या असलेल्या या चळवळीची १५ वी शिखर परिषद मागील वर्षी ईजिप्त मधील शर्म-उल-शेख शहरात पार पडल्याची घटना नेहरूप्रणीत दृष्टिकोणाच्या जगाच्या राजकारणावरील दूरगामी परिणामाची साक्ष पटविते. स्वतःच्या पायावर उभे राहणे आणि कोणत्याही परिस्थितीत दुसऱ्याचे बाहुले न बनणे, हा नेहरूंच्या चळवळीच्या स्थापनेचा मुख्य आधार होता.

देशात आणि देशाबाहेर नेहरूंच्या अलिप्ततावादी धोरणावर सडकून टीकाही झाली आहे. कोणी त्याला स्वार्थी, संधिसाधू धोरण म्हटले आहे, तर कोणी कुंपणावर बसण्याचे धोरण म्हटले आहे. कोणी त्याला उदासीन, क्रियाशून्य, तटस्थ धोरण म्हटले, तर कोणी तिसऱ्या गटाच्या स्थापनेचा प्रयत्न म्हटले. नेहरूंनी मात्र संसदेत किंवा अन्यत्र संधी मिळेल तेव्हा अलिप्तवादाचा खरा आशय स्पष्ट करून संदेहाचे वातावरण दूर करण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या दृष्टिकोनातून अलिप्ततावाद हा मैत्रीपूर्ण सहअस्तित्व स्थापित करण्याचा सर्वोतम मार्ग होता. दुर्बलांचे दृढ ऐक्य, निम्न शक्तिशाली देशांच्या विविध राजकीय आणि आर्थिक तक्रारींच्या अभिव्यक्तींचा मार्ग, स्वयंनिर्णयाच्या अधिकाराची जोपासना, महासत्तांच्या सत्तासंघर्षाला नकार आणि आपल्या समोरील प्रश्नांबाबत उदासीन न राहता न्याय्या पक्षाच्या बाजूने सक्रिय हस्तक्षेप हा नेहरूप्रणीत अलिप्ततावादाचा आशयगाभा होता. चळवळीने आतापर्यंत हाताळलेले विविध प्रश्न आणि तिची अर्धशतकी वाटचाल लक्षात घेतली असता, देशाच्या प्रतिष्ठेत निश्चितच वाढ झाली आहे, असे म्हणता येते.

नेहरूंच्या परराष्ट्रधोरणावर अनेक आरोपही झाले आहेत. उदाहरणार्थ, लष्कराच्या आधुनिकीकरणाचा फारसा प्रयत्न त्यांनी केला नाही; परिणामी १९६२ साली चीनने लादलेल्या युद्धात भारताचा सपाटून पराभव झाला. लष्करी दृष्ट्या भारताचे सशक्तीकरण करण्याऐवजी आदर्शवादी आणि लोकानुरंजनवादी आंतरराष्ट्रीय प्रश्नां-वरच त्यांनी आपली अधिक ऊर्जा खर्च केली, असाही एक आरोप त्यांच्यावर केला जातो. शत्रुत्व असतानाही सुरक्षा परिषदेत चीनच्या स्थायी सदस्यत्वाच्या दाव्यास जाहीर पाठिंबा दिला, हा मुत्सद्दीपणाचा अभाव होता असे म्हटले गेले. अल्पसंख्यांप्रती असलेल्या गांधीवादी कळवळ्यात अनेकांना मुस्लिमांप्रतीच्या तुष्टीकरणाची बीजे दिसली. काळाबरोबर न जाता वेगळी वहिवाट पाडून स्वीकारलेला अलिप्ततावाद व्यवहार्य नव्हता. राष्ट्कुल संघटनेचे सदस्यत्व कायम ठेवण्याचा निर्णय गुलामीचे प्रतीक मानले जाऊ लागले. काश्मिरसमस्या आणि चिनी आक्रमण हे फसलेल्या आदर्शवादी जागतिक शांततेच्या धोरणाचाच परिणाम होता, असे समजले जाऊ लागले. काश्मिरचा प्रश्न सुरक्षा परिषदेत उपस्थित करून या समस्येचे त्यांनी आंतरराष्ट्रीयीकरण केले, असा आरोप त्यांच्यावर केला जातो.

तटस्थपणे या आरोपांकडे पाहिल्यास आणि तत्कालीन परिस्थितीच्या संदर्भात ते जोडून बघितल्यावर त्यांतील फोलपणा ताबडतोब लक्षात येतो. येथे एक बाब आम्ही लक्षात ठेवली पाहिजे ती ही, की 'शांतता' आणि 'अहिंसा' ही दोन गांधीवादी तत्त्वे नेहरूंच्या परराष्ट्र-धोरणाच्या नेहमीच केंद्रस्थानी राहिली आहेत. त्यामुळे शस्त्रीकरणाला ते नकार दर्शवितात. दुसऱ्या महायुद्धाने शस्त्रास्त्रांची विध्वंसकता भयंकरपणे सिद्ध केली होती. म्हणून शस्त्रमुक्त जगच शांती, स्थैर्य आणि समृद्धीची हमी देऊ शकेल, असा विश्वास त्यांना वाटत होता. अमेरिका आणि सोव्हिएत रशिया हे देश जीवघेण्या शस्त्रस्पर्धेत गुंतले असताना निःशस्त्रीकरणाची चळवळ शांतीचा मार्ग प्रशस्त करील, असे त्यांना वाटले असेल, तर त्यात काय गैर आहे? शांतीपूर्ण सहअस्तित्वासंबंधीच्या त्यांच्या प्रत्येक भूमिकेला आदर्शवादाच्या चौकटीत ठेवणे हा एकप्रकारे आदर्शवादच नव्हे काय? चीनच्या सुरक्षा परिषदेतील कायम सदस्यत्वासाठीच्या दाव्यास मान्यता देऊन शत्रुत्वाची धार कमी करण्याचा प्रयत्न करणे, हा व्यवहारवाद नाही काय? काश्मिरात पाकिस्तानने आक्रमण लादले असताना जागतिक शांतता व सहअस्तित्वासाठी स्थापन झालेल्या संयुक्त राष्ट्रसंघाच्या चौकटीत तो सोडविला जावा, अशी अपेक्षा ठेवणे अव्यवहार्य कसे असू शकेल? अखेर तो काळच आंतरराष्ट्रीय संस्थांच्या उपयुक्ततेची चाचपणी करण्याचा काळ होता, याकडे दुर्लक्ष करता येत नाही.

संयुक्त राष्ट्र संघटनेच्या मंचाचा जागतिक शांततेसाठी







अनुक्रमणिका

पुरेपूर उपयोग झाला पाहिजे, अशी त्यांची भूमिका होती. इंडोनेशियन स्वातंत्र्याचा प्रश्न (१९४९) असू देत की भूतपूर्व इटालियन वसाहतींचा प्रश्न (१९५१-५२), उत्तर कोरियाचे दक्षिण कोरियावरील आक्रमण (१९५०) असो की सुवेझ कालवा प्रकरणात ब्रिटन-फ्रान्सचे ईजिप्तवरील आक्रमण अशा सर्वच प्रकरणांत संयुक्त राष्ट्रसंघटनेच्या प्लॅटफॉर्मचा त्यांनी व्यवस्थित उपयोग करून घेतल्यामुळेच जगात शांतता नांदू शकली, हे विसरता येत नाही. १९६२ चे क्यूबाप्रकरण युनोच्या मंचावर अलिप्त राष्ट्रांच्या यशस्वी राजनयामुळेच निवळले आणि संभाव्य तिसऱ्या जागतिक महायुद्धाच्या धोक्यातून जगाची मुक्तता होऊ शकली.

नेहरूकाळ हा अशा प्रकारे भारताच्या परराष्ट्रधोरणातील महत्त्वपूर्ण टप्पा आहे. आज नेहरूंच्या परराष्ट्रधोरणाला साडेचार दशकांपेक्षाही अधिक काळ उलटून गेला आहे. जागतिकीकरण, उदारीकरणाची दोन आर्वतने पूर्ण झाली आहेत. दहशतवाद, ग्लोबल वॉर्मिंग, मानवाधिकारांची पायमल्ली, वंशवादी उद्रेक यांसारखे प्रश्न आपल्या पुढ्यात वाढून ठेवले आहेत. अशा स्थितीत विद्यमान भारतीय राजकीय नेतृत्वाने अगरबत्ती घेऊन पूजा करणे किंवा टोकाच्या मूर्तिभंजकाचा आविर्भाव बाळगणे, अशा दोन्ही प्रवृत्ती निग्रहपूर्वक टाळून आजच्या संदर्भात साक्षेपी विचार केला पहिजे. नेहरूवादातील जो आशय वर्तमान विदेशनीतीला साहाय्यभूत ठरतो, त्याचा स्वीकार केला पहिजे व जो आशयगाभा घातक ठरतो, त्याला निग्रहपूर्वक वगळले पाहिजे. विदेशनीतीचे दुसरे नाव हितसंबंधीय गतिशीलता असते; साचेबद्धपणा किंवा स्थितिशीलता नव्हे हे लक्षात ठेवून विद्यमान नेतृत्वाला परराष्ट्रधोरण ठरविण्याची सद्बुद्धी मिळो, अशी अपेक्षा ठेवू या!

ಌಌಌ

## वाचकांचा पत्रव्यवहार

चंद्रशेखर बर्वे
पुणे.

प्रति,
प्रा. कुचेकर,
कोल्हापूर.

सस्नेह नमस्कार

'नवभारत'च्या सप्टेंबर २०१२ अंकामधील आपला लेख उद्‌बोधक आहे. बाबासाहेबांच्या वेगळ्या पैलूंवर प्रकाश पाडणारा आहे. फोनवर हे मी आपल्याला सांगितले; ते आपल्या विनंतीवरून या पत्रातून कळवत आहे.

मुंबई-पुण्याबाहेर, दूरदूरच्या ग्रामीण भागांतही ज्ञानसाधना करणारे, सकस लेखन करणारे आहेत, हे अशा लेखांमुळे कळते; समाधान होते.

अलीकडच्या काळातील 'नवभारत'ची वाटचाल या दृष्टीने अधिकाधिक उपकारक व आश्वासक वाटते. संपादकांपर्यंत माझे समाधान मी पोचवले आहेच.

नवनवीन लेखकांमुळे, जिव्हाळ्याच्या समस्या-विषयांवरील लेखांमुळे, 'नवभारत'सारख्या मासिकांच्या प्रोत्साहनामुळे महाराष्ट्रातील वैचारिक अभिसरण सुधारेल आणि सर्व थरांत वितंडवादाची जागा सुसंवाद घेईल.

भारतीय लोकसत्ता सशक्त होण्याकरिता हा सुसंवादच उपकारक ठरेल.

आपले अभिनंदन; आपल्याला शुभेच्छा!

आपला,
चंद्रशेखर बर्वे
पुणे.

अनुक्रमणिका

## लेखकांचा परिचय

### ✠ प्रा. डॉ. गोमटेश्वर पाटील

'विसाव्या शतकातील कादंबरीची समीक्षा' या विषयावर पी.एच.डी., विलास सारंग यांच्या कथांचा अभ्यास. अर्वाचीन मराठी जैन साहित्य (१८५०-२०००) या मेजर प्रोजेक्टवर अभ्यास सुरू.

***पत्ता :–*** सहायक प्राध्यापक, महावीर महाविद्यालय, कोल्हापूर–४१६१०१.
भ्रमणध्वनी : ९८५०७५८२०७

### ✠ श्री. अनिल जोशी

इंग्रजी विषयाचे निवृत्त शिक्षक, जनता शिक्षण संस्थेचे सचिव, प्राज्ञपाठशाळा मंडळाचे सहसचिव आणि पत्रकार आणि लेखक.

***पत्ता :–*** १२४४, रामडोह आळी, वाई, जि. सातारा.-४१२८०३
भ्रमणध्वनी : ९७६६९९५९०४.

### ✠ प्रा. डॉ. पंडितराव शा. पवार

मराठीचे निवृत्त प्राध्यांपक. एम. ए., पीएच. डी. (मराठी); नाशिक जिल्हा मराठा विद्याप्रसारक समाज, नाशिक या संस्थेत ३० वर्षे प्राचार्य. पुणे विद्यापीठाचा उत्कृष्ट प्राचार्य म्हणून पुरस्कार. साहित्य व शिक्षण यांवर लेखन. गेली चाळीस वर्षे उच्चशिक्षण क्षेत्रात कार्यरत आहेत.

***पत्ता :–*** ६, ऋषिराज पार्क, अरिहंत नर्सिंग होमजवळ, मधुकमल नगर, गंगापूर रोड, नाशिक–४२२०१३.
दूरध्वनी : (०२५३) २३४३७८७,
भ्रमणध्वनी : ९४२३१८१०८७.

### ✠ न्या. नरेंद्र चपळगावकर

भूतपूर्व न्यायाधीश, उच्च न्यायालय (महाराष्ट्र राज्य); कर्मयोगी संन्यासी व स्वामी रामानंद तीर्थ यांच्या अभ्यासपूर्व चरित्राचे कर्ते. भारतीय राज्यघटनेवर अभ्यासपूर्ण लेखन. साहित्याचे व्यासंगी अभ्यासक.

***पत्ता :–*** १३, जयनगर, दशमेशनगरजवळ, औरंगाबाद. ४३१ ००५.
दूरध्वनी (०२४०) २३३११६६.

### ✠ प्रा. विठ्ठल दहिफळे

पीपल्स कॉलेज, नांदेड येथे पदव्युत्तर राज्यशास्त्र विभागात साहाय्यक प्राध्यापक म्हणून कार्यरत, 'महाराष्ट्र राज्यशास्त्र व लोकप्रशासन परिषदेचे' ते विद्यमान उपाध्यक्ष आहेत. नवभारत, साधना, समाज प्रबोधन पत्रिका, सत्याग्रही, परिवर्तनाचा वाटसरू आदी नियतकालीकांतून विविध विषयांवर सातत्याने त्यांनी लिखाण केले आहे.

***पत्ता :–*** पीपल्स कॉलेज, नांदेड. भ्रमणध्वनी : ९९२२६५४४३२.

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आमचे नवीन प्रकाशन

# साहित्याचे तर्कशास्त्र

## (तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांची साहित्यविषयक अध्यक्षीय भाषणे)

**संपादक : सीताराम रायकर, द. दि. पुंडे, पंडित टापरे**

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी अनेक प्रसंगी साहित्यावर आपल्या भाषणांमधून जे विचार मांडले त्या भाषणांचा हा संग्रह मराठी साहित्याच्या अभ्यासकांना आणि सर्वसामान्य वाचकांनाही मार्गदर्शक ठरावा असा आहे. या ग्रंथात शास्त्राजींनी संस्कृत साहित्यशास्त्राचे विचारमंथन तर केलेले आहेच, या खेरीज त्यांनी आधुनिक साहित्यविचाराचीही दखल घेतलेली आहे. हा ग्रंथ मराठी साहित्याच्या अभ्यासकांना अतिशय मौल्यवान ठरावा असाच संपन्न झालेला आहे.

संपादन मंडळाने प्रदीर्घ प्रस्तावना सुरुवातीस देऊन या ग्रंथाचे मोल अधिकच वाढविले आहे.

**पुष्ठे : ४२+ ४३७** **किंमत रू. ७५०/-**

**संपर्क : चिटणीस, प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५, गंगापुरी, वाई, जि. सातारा.**

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# वैदिक संस्कृतीचा विकास

(तिसरी आवृत्ती, १९९६)

**प्रा. मे. पुं. रेगे यांच्या विवेचक पुरस्कारासह**

वैदिक संस्कृतीचा विकास ह्या बृहद् ग्रंथात शास्त्रीजींनी अधिकाराने आणि कौशल्याने आपल्या प्रदीर्घ सांस्कृतिक वारशाचे आत्मीयतेने पण चिकित्सकपणे परीक्षण केले आहे. त्यांच्या संस्कृत वाङ्मयाच्या व्यासंगाच्या व्याप्तीची कल्पना या ग्रंथावरून चांगली येते. वैदिक वाङ्मय, दर्शने, महाकाव्ये, शास्त्रे, पुराणे, बौद्ध व जैन साहित्य इत्यादी सर्व शाखांतील संस्कृत साहित्याचा त्यांनी आपल्या विवेचनात पुरेपूर उपयोग केला आहे. वैदिक संस्कृतीची समावेशक, उदार, विधायक बाजू त्यांनी उलगडून दाखविली आहे.

**डेमी आकाराची ३६+ ५७२ पृष्ठे**

**किंमत रू. ३००/-**

**प्राज्ञपाठशाळा मंडळ**
३१५, गंगापुरी, वाई, जि. सातारा

# लेखकांस आवाहन

'नवभारत' मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण 'नवभारता' कडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना 'नवभारत' च्या संपादकांना द्यावी.

४. 'नवभारत' मध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात 'नवभारत' मध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी. आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

- संपादक मंडळ

अनुक्रमणिका








# नवभारतास

# हार्दिक

# शुभेच्छा !

## - पु.ना. गाडगीळ आणि कंपनी
## यांच्याकडून

हे मासिक घ. वा. जोशी यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून
सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




